# प्रस्तावना

संस्कृत वाङ्मयांत 'शाकुंतला' इतकेच 'मृच्छकटिका'चें महत्त्व आहे. इंग्रजी भाषेंत त्याचीं अनेक भाषांतरें झालेलीं आहेत. कै. गोविंदराव देवल यांचें 'मराठी' 'मृच्छकटिक' नाटक तर महाराष्ट्रीय रंगभूमीचा जीव कीं प्राण होतें. ह्या कथाभागावर मागें दोन चित्रपट तयार झाले होत, पण त्यांची फारशी कोणाला आठवणही राहिलेली नाहीं; ह्याचें कारण ते बोलपट वाङ्मयात्मक दृष्टीनें व मुळाबरहुकूम घेतले गेले नाहींत. मराठी भाषेंत 'वसंतसेना' हा पहिलाच बोलपट असला तरी रुपेरी पडद्यावर येणारी वाङ्मयांतील अमर कृति या दृष्टीनें हा बोलपट हिंदुस्थानांत अद्वितीय म्हणून समजला जाईल.

राजा शूद्रकाच्या मूळ 'मृच्छकटिक' नाटकाचे दहा अंक आहेत. सदर 'वसंतसेना' या बोलपटाची लांबी पंधरा हजार फूट आहे. मूळ नाटकांतलि संवाद, कल्पना, विचार, विनोद, काव्य, प्रसंग यांमधील मौलिक सादर्य आहे तसेच कायम ठेवण्यांत आलेलें आहे, हें या बोलपटाचें प्रभावी वैशिष्टय आहे. विश्वविद्यालयीन परीक्षेसाठीं 'मृच्छकटिक' नाटकाचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांलाहि हा बोलपट पहातांना त्या अभ्यासाची उजळणीच झाल्यासारखी वाटेल. 'मृच्छकटिका'चें ऐतिहासिक सौंदर्य तसेंच ठेवलेलें आहे, म्हणून ह्या बोलपटाला वाङ्मयात्मक दृष्टीनेंहि फार महत्त्व प्राप्त होणार आहे. पुष्कळ वेळां बोलपट निर्माण करतांना मूळ कथाभागांत मोठमोठे फेरबदल करण्यांत येतात. त्यामुळें त्याचें मूळ स्वरूप बदललें जातें आणि त्यामुळें वाङ्मय-भक्तांच्या भावना दुखावल्या जातात. तसें भय ह्या ठिकाणीं सुतरामृहि नाहीं. मूळच्या 'मृच्छकटिक' नाटकाच्या एकनिष्ठ रसिकभक्तांचें सर्वस्वीं समाधान करील असा ह्या बोलपट आहे.

असें असूनहि त्यामध्यें जो बदल आचार्य अत्रे ह्यांनीं केलेला आहे त्यामुळें मूळ कथाभागाचें सौंदर्य कमी न होतां जास्त वाढलेलेंच आहे असें अखेर रसिकांचें मत होईल. मृच्छकटिक नाटक हें पंचवीसशें वर्षांपूर्वीच्या समाजाचें वास्तववादी चित्र आहे. हें नाटक एका राजानें लिहिलें असल्या-मुळें त्यानें दैवी किंवा राजवंशीय पात्रें नाटकांत रंगविलेलीं नाहींत. नाटकाचा नायक हा श्रीमंत व्यापाऱ्याचा पुत्र असून नायिका ही नायकिणीची मुलगी

आहे. मूळ नाटकांत उज्जैनीचा जुलमी राजा पालक ह्याला काढून त्याचे-ऐवजीं गोपाळपुत्र आर्यक हा लोकांचा आवडता राजा गादीवर बसविण्याची शर्विलक वगैरे मंडळी खटपट करतात ह्याचा नुसता उल्लेखच आहे. तथापि ती पार्श्वभूमि मूळ नाटकांत तितकीशी स्पष्ट झालेली नाहीं, ती 'वसंतसेना' बोलपटांत अधिक स्पष्ट आणि अर्थपूर्ण करण्याचा प्रयत्न केलेला आहे. जनतेच्या स्वातंत्र्याच्या झगड्याच्या भूमिकेवर चारुदत्त आणि वसंतसेना ह्यांच्या प्रणयकथेचें स्वरूप अधिकच आकर्षक झालेलें वाटेल. आपल्या गडगंज संपत्तीचा अतिथि-अभ्यागतांना दानधर्म करून चारुदत्त दरिद्री झाला आहे असें मूळ नाटकांत आहे. अशा आंधळ्या दानधर्मामुळें आलेल्या दारिद्र्याबद्दल राध्यां कोणालाही आदर वाटणार नाहीं. चारुदत्ताच्या नायकत्वाला तो एक उणेपणाच आहे. शिवाय त्या वेळच्या लोकांच्या झगड्याबद्दल संपूर्ण-पणें उदासीन राहून चारुदत्त केवळ प्रणयविलासांत गुंग असतो हीही गोष्ट त्याच्या मोठेपणाशीं विसंगत आहे. एवढ्यासाठी चारुदत्ताच्या भूमिकेला निराळीच कलाटणी देणे जरूर होतें. जुलमी राजाच्या विरुद्ध लोकांची जी गुप्त संघटना होत होती तिला अर्थसहाय्य करण्याच्या संशयावरून चारु-दत्ताची धन-दौलत राजानें हिरावून घेतलेली होती आणि त्यामुळें त्याला दारिद्र्य प्राप्त झालें होतें असा बोलपटांत बदल केलेला आहे. चारुदत्त वसंतसेनेच्या प्रेमपाशांत पडतो त्याच क्षणीं राजकोपामुळें त्याच्यावर दारि-द्र्याची आपत्ति पडते येथून बोलपटाला प्रारंभ झालेला आहे; आणि शेवट उज्जैनींत राज्यक्रांति होऊन लोक सुखी होतात आणि वधाच्या शिक्षेमधून चारुदत्ताची मुक्तता होऊन त्याचें आणि वसंतसेनेचें जनतेच्या आनंदीआनं-दाच्या पार्श्वभूमीवर मीलन होतें. मूळ नाटकामध्यें चारुदत्ताची प्रथम पत्नी धूता दाखविलेली आहे. नाट्यवस्तूंत हिचें कार्य अत्यंत गौण आहे; किंबहुना तें पात्र नाट्याच्या आणि कथाविकासाच्या दृष्टीनें विपर्यान्तरच आहे. म्हणून बोलपटांत चारुदत्त हा विधुर दाखविलेला आहे. त्यामुळे त्याच्या प्रणया-तुरतेला कोणत्याही तऱ्हेचें वैगुण्य उत्पन्न होत नाहीं. उलट त्यामुळें ही प्रेमकथा जास्त उदात्त झालेली आहे. ह्याशिवाय कथाविकासाच्या दृष्टीनें मूळ कथेमधील पुष्कळसें विषयान्तर आणि विस्तार बोलपटामध्यें अजिबात गाळून टाकलेला आहे, आणि कथासूत्र रुपेरी पडद्यावर जास्त गतिमान, सुसंगत आणि सुसंघटित व्हावें म्हणून किरकोळ पण आवश्यक असे बदल केले आहेत.

रंगभूमि आणि रुपेरी पडदा ह्यामध्यें मौलिक तफावत किती असते हें ताडून पहाण्यास हा बोलपट ही एक उत्कृष्ट कसोटी ठरेल. रंगभूमीवर घडणारीं कांहीं दृश्यें रंगभूमीच्या मर्यादित सामर्थ्यामुळें परिणामाच्या दृष्टीनें किती दुबळीं ठरतात याचा प्रत्यय हा बोलपट पहात असतांना येईल. पहिलें दृश्य कामदेव मंदिरांतील वसंतोत्सवाचें. ह्या उत्सवांतच चारुदत्त वसंतसेनेवर मोहित झाला. मूळ नाटकांत हें नुसतें शब्दांनीं सांगितलें आहे. बोलपटाचा आरंभच मुळीं ह्या कामदेवाच्या उत्सवानें झालेला आहे. उज्जैनींतील सर्व कलोपासक तरुण–तरुणी कामदेवाच्या उत्सवांत धुंद झाले असतांना तें वातावरण ह्या दोघांच्या प्रेमाला किती पोषक ठरतें ह्याचें समर्थन हें दृश्य पाहिल्यावांचून होणार नाहीं. पावसाच्या सरी डोक्यावर कोसळत असतांना चारुदत्त आणि वसंतसेना ह्यांची भेट होते, हा देखावा रंगभूमीवर कधीं यथार्थत्वानें दाखविनां येणें शक्य आहे काय? तथापि तेवढ्या तुटपुंज्या दर्शनावर आंबटशोकी रसिक बेहद्द खूष होते. बोलपटांतील हा देखावा म्हणजे कथाबिंदूचा परमोच्च कळस होय. चारुदत्त–वसंतसेना ह्यांच्या प्रणयाची ती पराकाष्ठा आहे. बोलपटांत हा देखावा किती विलक्षण परिणामकारकतेनें आणि वास्तवतेनें घेतलेला आहे हें प्रत्यक्षच पाहिलें म्हणजे कळेल. मूळ 'मृच्छकटिक' नाटकांतील हा अद्भुतरम्य काव्यमय प्रसंग रंगभूमीपेक्षां रुपेरी पडद्यावरच जास्त परिणामकारक ठरेल. वधाच्या आरोपावरुन न्यायासनासमोर चारुदत्तावर जो खटला होतो त्याचें दृश्य रंगभूमीवर परिणामकारक रीतीनें वठलें जात नाहीं. त्यामुळें नाटकांत गौणत्त्व उत्पन्न होतें. चारुदत्ताचा धीरोदात्त स्वभाव प्रेक्षकांच्या मनावर बिंबत नाहीं. हें वैगुण्य बोलपटांत मुळींच आढळून येणार नाहीं.

चारुदत्ताच्या वधयात्रेचा आणि वधस्तंभाशेजारचा देखावा दर्शविण्यासहि रंगभूमि असमर्थ आहे; तो परिणामकारक करण्याचें तर तिच्या सर्वस्वीं आटोक्याबाहेरचें आहे. ह्या वधयात्रेचें भीषण स्वरूप बोलपटांत यथार्थत्वानें दाखविलेलें आहे. उज्जैनीचे हजारों नागरिक कसे प्रक्षुब्ध झाले आहेत, राजाचे दूत त्यांच्या अंगावर घोडे घालून त्यांच्या त्वेषाच्या लाटा कशा थोपवतात, एवढ्या गर्दीतून बुद्धभिक्षू वसंतसेनेला आंतपर्यंत कसें आणतात; शिरच्छेदाच्या ऐनवेळीं चारुदत्त आणि वसंतसेनेची भेट कशी होते याचीं रोमहर्षण आणि प्रक्षोभक दृश्यें पडद्यावरच पहातांना प्रेक्षकांच्या वृत्ति स्तंभित झाल्याविना रहाणार नाहींत. मृच्छकटिक म्हणजे मातीचा

गाडा ! हा मातीचा गाडा सान्याचा करून पाहिजे या रोहसेनाच्या हट्टामुळें कथानकाच्या नाट्याचा विकास होतो, हें मूळसूत्र नाटकांपेक्षां बोलपटांत अधिक स्पष्ट झालेलें आहे. हास्यकारक कालपुरुष म्हणून शकार हा जगाच्या वाङ्मयांतील अद्वितीय नमुना शूद्रकानें या नाटकांत निर्माण केला. चारुदत्त आणि वसंतसेना ह्यांच्या नाट्यकथेंत शकाराचा भाग किती मोठा आहे ही गोष्ट रंगभूमीपेक्षां बोलपटाच्या मुळेंच प्रेक्षकांच्या मनावर अधिक ठसेल. शकाराचा हा शोध केवळ बोलपटामुळेंच प्रेक्षकांना लागेल. रंगभूमीवरील बोलपटाचा सर्वांत मोठा विजय म्हणजे कथाभाग ज्या वातावरणांत घडतो तें वातावरण ऐतिहासिक स्वरूपांत प्रेक्षकांना पहावयाला मिळेल. रंगभूमीवर चारुदत्त पुणेरी पगडी आणि आंगरखा घालून येतो; वसंतसेना गोवेंकरणीचा पोषाख करते; आणि शकार दक्षिणेंतल्या एखाद्या रंगेल संस्थानिकांचा थाट करतो. ही विसंगति रुपेरी पडद्यावर आढळणार नाहीं. सव्वीसशें वर्षांपूर्वीच्या बुद्धकालीन वेषभूषेच्या, कलाभूषेच्या आणि शिल्पभूषेच्या भव्य वातावरणांत ही ' वसंतसेना ' अवतीर्ण झालेली असल्यानें ती अधिक वास्तववादी वाटेल. त्यामुळें वसंतसेनेची कलाप्रियता, नृत्यप्रियता, सौंदर्यासक्ति ही अधिक खुलून दिसते; एवढंच नव्हे तर मूळच्या ' मृच्छकटिक ' नाटकाचें भव्य आणि उदात्त सौंदर्य अधिक सामर्थ्यानें प्रतीत होतें.

राजा शूद्रकाचें ' मृच्छकटिक ' नाटक हा संस्कृत वाङ्मयांतील कोहिनूर आहे. त्याचें दैदीप्यमान सौंदर्य चिरंतन आहे. त्या नाटकाचा प्रयोग कोणी कितीही कौशल्यानें केला किंवा त्या नाटकावर कोणी कितीहि उत्कृष्ट बोलपट निर्माण केला म्हणून त्यामुळें मूळ वाङ्मयकृतीचें सौंदर्य कांहीं वाढणार नाहीं. पण मूळ नाटकाचें सौंदर्य किती दिव्य आणि भव्य आहे हें कळ-ण्यास नाट्यप्रयोगापेक्षां बोलपट हाच अधिक प्रभावी ठरतो हें अत्रे पिक्चर्सच्या ' वसंतसेना ' या परिणामकारक बोलपटानें पुरेपूर सिद्ध केलेलें आहे. या विधानाची सत्यता वाचकांनीं हा बोलपट पाहून पडताळावी म्हणजे वाङ्मयात्मक दृष्टीनें या बोलपटानें किती थोर कामगिरी केलेली आहे हें त्यांना कळून येईल.

—मी

: : १

उज्जयिनी नगराबाहेरील भगवान् कामदेवाचें मंदिर. कामदेवाच्या प्रतिवर्षी भरणाऱ्या उत्सवाचा तो दिवस आहे. भगवान् कामदेव म्हणजे विलासी तरुण स्त्रीपुरुषांचें अधिदैवत; त्यामुळें मंदिराच्या सभामंडपांत आणि आवारांतील उद्यानांत तरुण भक्तजनांची गर्दी उसळलेली आहे. सर्वांनीं गळ्यांत, अंगावर, डोक्यावर फुलांचा शृंगार केलेला आहे. कपाळावर, तळहातावर आणि पायावर केशराच्या आणि चंदनाच्या उट्या लावलेल्या आहेत. मंदिरांतील कामदेवाची मूर्ति फुलांनीं आणि सुवर्णालंकारांनीं शृंगारलेली असून बाजूला मोठमोठे नंदादीप तेवत आहेत. भगवान् कामदेवाच्या पराक्रमाची आणि सामर्थ्याची स्तवनें म्हणत स्त्री-पुरुष इतस्ततः आनंदानें नाचत आहेत. कोणी लताकुंजामधून एकमेकांचा पाठलाग करीत आहेत, तर कोणी कमलपुष्पांनीं विभूषित असलेल्या पुष्करणींत पाय सोडून बसले आहेत. एवंच, चहूंकडे गायनाचा आनंदी जयघोष आणि पैंजणाचा मंजुळ झंकार यावांचून कांहींच ऐकूं येत नाहीं. कांहीं मंडळी प्रत्यक्ष उत्सवामध्यें वा नृत्यामध्यें भाग घेत नाहींत; ती मंदिराच्या निरनिराळ्या भागांत निवांतपणें बसून नृत्यसोहळा पाहात आहेत.

**एक पूजक** : भगवान् कामदेवा, आपल्या कुसुम बाणांनीं अखिल जगाला जिंकणाऱ्या हे मदना, चराचर सृष्टीला मोहित करणाऱ्या हे प्रीतीच्या परमेश्वरा, आज सारी उज्जैनी नगरी तुझ्या जयजयकारांनीं धुंद झालेली आहे. या तुझ्या तरुण भक्तजनांना, तुझ्या आशीर्वादानें सदैव धन्य कर.

कामदेवाचें जयगीत सुरू होतें.

जय मदना, रतिरमणा,
तरुण जनांचा तूंच राणा !
फुलविसि झुलविसि तूं जिवांना !
सोड फुलांचे गोड गोड बाण,
छेड छेड प्राण, जिंक जिवांना !
नवरमणींच्या तूं नयनीं, कां लपसी ?
प्रिय रमणांच्या करपाशीं, कां दडसी ?
युवयुवतींच्या तूं अधरीं थरथरसी !
चुंबनप्याले रसरसले,
पिऊनी तुझे हें जग जगलें !
मरणाचें भय नच तरुणा !

नृत्य चालू असतांना राजपुत्र आर्यक आणि शर्विलक गुप्त वेषांत येऊन उभे राहातात.

**दुसरा पूजक** : वसंतसेना, वसंतसेना, या उज्जैनीची नर्तकी, लावण्यलतिका वसंतसेना, आज भगवान् कामदेवाच्या उत्सवांत नाचून आपल्या नृत्यकलेची पताका प्रथमच फडकावणार आहे.

मंदिरांतील सर्व लोक "वसंतसेना—वसंतसेना" म्हणत सभामंडपाकडे धांवतात. वाद्यांचे सूर पुनः उसळतात. पैंजणांचा झंकार निनादूं लागतो, आणि वसंतसेना कामदेवाच्या मूर्तीपुढें नृत्य करीत आहे असें दृश्य दिसतें. नृत्य सुरू झाल्याबरोबर

आर्य चारुदत्त एका कोरीव खांबाजवळ येऊन उभा राहातो. त्याच्या कमरेला मंत्रिपदाचें चिन्ह म्हणून खड्ग व डोक्याला सोन्याचा अर्धकिरीट आहे.

वसंतसेनेच्या सौंदर्याची ख्याति संबंध उज्जयिनी नगरामध्यें आधींच पसरलेली असते. आजपर्यंत तिला प्रत्यक्ष अशी कोणीच पाहिलेली नसते. कामदेवाच्या या उत्सवांत नृत्य करण्यासाठीं प्रथमच ती आलेली असते; म्हणून तिचें नृत्य बघण्यास तरुण स्त्रीपुरुषांची गर्दी उसळलेली असते. जो तो तिचें नृत्य अपक्ष्म लोचनांनीं पहात असतो.

आर्य चारुदत्त तर रसिकतेचा मूर्तिमान् सागर. नृत्य, संगीत अन् सौंदर्य यांचा तो वेडा ! वसंतसेनेचें सौंदर्य व चेतोहर लास्य बघून प्रथम दर्शनींच तो तिच्यावर मोहित होतो. आणि वसंतसेना—ती कामदेवासमोर निरनिराळ्या मुद्रा करीत आणि गिरक्या घेत, नाचत नाचत मंडपाच्या मध्यभागीं येते, आणि एकदम तिला चारुदत्ताची मूर्ति दृष्टीस पडते. तिला तर तो साक्षात् भगवान् कामदेवच वाटतो. "हा कामदेव कां तो कामदेव" असा तिला क्षणैक संभ्रम पडतो. तत्क्षणीं ती भान विसरते व चारुदत्ताला 'कामदेव' समजून ती त्याच्यापुढें नाचूं लागते. चारुदत्त तिच्याकडे मोहित दृष्टीनें पाहूं लागतो. सभामंडपांतील तरुण स्त्रीपुरुष एकमेकांकडे पाहून नुसते स्मित करतात. वसंतसेनेची आई रंभा मोठ्या अभिमानानें नाच पाहात असते. लोक वसंतसेनेवर खूष आहेत हें बघून तिला स्वर्ग दोन बोटें राहातो. वसंतसेना क्षणमात्रानें भानावर येते; तशी ती एकदम गिरक्या मारून कामदेवाच्या मूर्तिकडे वळते. नृत्य संपत येतें. वाद्यांचे स्वर चढूं लागतात. शेवटची गिरकी घेऊन धुंद स्थितींत वसंतसेना कामदेवाच्या मूर्तिसमोर अवनत होते.

इतक्यांत चारुदत्ताचा प्रिय मित्र मैत्रेय चारुदत्ताला शोधीत गर्दीतून येतो. देवळा बाहेरील रस्त्यावर दवंडीची झांजट वाजते.

**राजदूत** : पौरजनहो, ऐका हो ऐका ! राजाचा शत्रु जो गोपालपुत्र आर्यक, त्याला गुप्त सहाय्य करीत असल्याच्या संशयावरून पालक महाराजांनीं आर्य चारुदत्त यांना मंत्रिपदावरून दूर केलें असून, त्यांचें घरदार, संपत्ति सर्व कांहीं हिरावून घेण्याची महाराजांनीं आज्ञा केली आहे हो !

ही राजघोषणा ऐकून मंदिरांतील सर्व लोक दिङ्मूढ होतात. उत्सवाच्या त्या आनंदावर एकदम विरजण पडतें. मैत्रेय चारुदत्ताजवळ येतो.

**मैत्रेय :** मित्रा चारुदत्ता !

**चारुदत्त :** कोण ?

**मैत्रेय :** मी मैत्रेय–आधीं घरीं चल ! राजदूतांनीं तिकडे कहर चालवला आहे !

कामदेवाच्या मूर्तीपुढें संभ्रांत मनस्थितींत बसलेली वसंतसेना डोक्यावर अशनिपात पडावा अशा मुद्रेनें चारुदत्ताकडे पाहाते.

आर्यक अधिकच संतप्त झालेला आहे.

**आर्यक :** माझ्यामुळें चारुदत्तावर संकट ?

**शर्विलक :** हळूं महाराज, ऐकेल कुणी—

**आर्यक :** शर्विलक, आत्तांच्या आत्तां जाऊन पालक राजाचा वध करूं कां ?

**शर्विलक :** शांत व्हा महाराज ! पालकाच्या अन्यायाचा घडा आतां कांठोकाठ भरला आहे. चला महाराज, इथं फार वेळ उभे राहाल तर ओळखेल आपल्याला कुणी तरी.

दोघेंही हलकेंच अंधारांत नाहींसे होतात. राजशालक संस्थानक विजयानंदानें मंदिरांत प्रवेश करतो. त्याच्याबरोबर विट आणि चेट आहेत.

**शकार :** ( मोठमोठ्यानें हंसत ) कशी फजिती केली त्या चारुदत्ताची ! ए–हशा, नाचा, गा, उड्या मारा ! या कामदेवाचा उच्छव कशाला करतां ? माझा उच्छव करा, मी राजाचा मेहुणा–संस्थानक, मनुष्य वाशुदेव, पुरुषश्रेष्ठ आहे. माझा उच्छव करा. मी उज्जयिनी नगराचा नगररक्षक आहे. माझा उच्छव करा.

**रंभा :** वसंतसेना ! ऊठ–ऊठ लवकर. असं काय करतेस ?

**शकार :** वसंतशेना–वसंतशेना ती हीच कीं काय ?

**रंभा :** होय महाराज, हीच माझी मुलगी वसंतसेना !

वसंतसेना एकदम उठून स्वतःला सावरते व जाऊं लागते. मंदिरांतील मंडळी हळुंहळूं चालूं लागतात.

**शकार :** तुझी मुलगी ना ? मग लाजते कशाला इतकी—ए वशंतशेने, इकडे ये, मला नाचून दाखव थोडंशं !

**रंभा :** आजपर्यंत ती कधीं पुरुषाच्या वाऱ्याला उभी राहिली नाहीं महाराज ! आजच पहिल्यांदा इतक्या लोकांसमोर आली म्हणून—लाजतेय् थोडीशीं ! तिला क्षमा करा ! ( रागवून ) वसंतसेने ! असं काय करतेस—दाखव नाचून यांना !

**वसंतसेना :** आई, नाचलें तर देवापुढं नाचेन, माणसापुढं नाहीं हा माझा निश्चय तुला माहीत आहे ना ?

**शकार :** देवापुढें नाचतेस ना, मग झालं तर ! अग, मी राजाचा मेहुणा म्हणजे देवच आहे कीं ! मला नाचून दाखवशील तर मी तुला खूप खूप दागिने देईन, भिऊं नकोश. तळलेले माशे देईन. रावणाला बघून कुंती जशी घाबरली किंवा रामाला बघून द्रौपदी जशी पळाली, तशी तूं मला भिऊन पळूं नकोश ग—

वसंतसेना जाऊं लागते.

**रंभा :** वसंतसेने, अग असं करूं नकोस. राजाचे मेहुणे आहेत ते !

वसंतसेना एकदम निश्चय करून तीरासारखी निघते. रंभा " वसंतसेना–वसंतसेना " म्हणत तिच्या पाठोपाठ जाते.

**शकार :** मित्रा विटा, कोंबडयाला पाहून लांडोर जशी पळून जाते, तशी ती पळून चालली कींरे ! जा जा, अडव तिला, अडव.

विट आणि चेट तिला अडवायला जातात. चारुदत्त खड्ग उपसून त्यांना अडवतो. शकार तेथें येतो.

**चारुदत्त :** पुढें पाऊल तर टाका—

**शकार :** ए मार्गे शर–मी राजाचा मेहुणा आहे–( चारुदत्ताला पाहून ) अं ऽ चारुदत्त ! अरे भिकारड्या, माझ्या अंगावर खड्ग उपशतोश ? विटा आण पाहूं माझं खड्ग !

**चारुदत्त :** माझ्याशीं लढतोस ?

**शकार :** हं ऽ ! तुझ्याशीं ? तूं भिकारी झाला आहेश ! तुला राह्यला आतां घर देखील नाहीं ! तुझ्याबरोबर आतां कोण लढतोय ? अन् त्यांनून आज शोमवार आहे. शोमवारीं आम्हीं लढत नशतो—काय रे विटा ?

**विट :** छे छे, सोमवारीं—अंहं भलतंच ?

चारुदत्त तिरस्कारानें त्याच्याकडे पाहतो. तो व मैत्रेय जाऊं लागतात.

**शकार :** ए, चाललाश कुठं ? काढ तो डोक्यावरचा किरीट अन् टाक तें खड्ग.

**मैत्रेय :** नको काढूस रे ! ( शकारावर चिडून ) तूं कोण सांगणार यांना !

**शकार :** मी—मी नगररक्षक आहे अन् राजाचा मेहुणा आहे. आतां ह्या कांहीं मंत्रि नाहीं ! आतां याला वाटेल तें करायला मी शांगेन, अन् यानं माझं ऐकलं नाहीं तर मुशक्या बांधून चावडीवर नेईन ! ए काढ, काढ, काढ तो किरीट !

चारुदत्त डोक्यावरचा अर्धकिरीट आणि खड्ग फेंकून देतो व त्वेषानें चालता होतो.

**शकार :** ( मोठमोठ्यानें हंसत ) कशी फजिती केली त्या चारुदत्ताची ! उंदराला बघून मांजर जशं पळून जातं, तशं मला भिऊन तो पळून गेला. ए माझं शिंहाशन करा ! ( चेट वाकून बसतो—विट बाजूला बसतो. शकार चेटाच्या पाठीवर बसतो ) मी राजाचा मेहुणा, म्हणजे राजाच आहे या नगराचा. ( एकदम आठवण होऊन ) ए उठा, उठा—

**चेट**<br>**विट** } ( उठून ) काय महाराज ?

**शकार :** अरे, माझं डोकं खाजवा. कांहीं तरी विशरलों आहे मी. ( ते त्याचें डोकें खाजवतात..) आं—आतां आठवलं. ती गर्भदाशी वशंतशेना इथून पळून गेली—

**विट :** जाऊं द्या महाराज—

**शकार** : जाऊं द्या कशी—माझ्यापुढें नाचली नाहीं—माझा अपमान केला तिनं ! कोण समजते मला ती ? मी राजाचा मेहुणा आहे. चला, तिला शोधून काढूं. दुःशाशनानं जशा कैकयीचा बुचडा धरून तिला ओढीत नेलं, तशं मी त्या वशंतशेनेला बुचडा धरून तिला फरफर ओढीत आणतो.

सारे जातात.

: : २

चारुदत्त आपल्या घराच्या बाहेर पडत आहे. भोंवतालीं लोकांची गर्दी जमली आहे. एक राजदूत रोहसेना जवळून त्याचा सोन्याचा गाडा हिसकावून घेतो.

**राजदूत** : कुठं घेऊन चाललास सोन्याचा गाडा ?

**मैत्रेय** : अरे, या बाळाचा तो सोन्याचा गाडा तरी नेऊं नका रे.

**राजदूत** : चल थेरड्या—

राजदूत मैत्रेयेला ढकलतात. तो कोलमडतो. रोहसेन "माझा सोन्याचा गाडा" म्हणून रडत आहे. लोक अतिशय संतप्त झालेले आहेत.

**एक म्हातारा** : थांबा, हा अन्याय आहे.

राजदूत त्याला आसूडांनीं मारतो. सर्वजण गाडींत बसतात. गाडी चालूं लागते.

: : ३

मैत्रेयाचें घर. राजवाड्यासारखें घर जाऊन चारुदत्त आतां एका सामान्य घरांत राहावयाला आलेला आहे. चारुदत्त देवघरांत देवाच्या मूर्ति पुढें डोळे

झाकून आणि हात जोडून प्रार्थना करीत आहे. एका कोपऱ्यांत रोभिल बसलेला आहे. मैत्रेय उद्विग्न झालेला असून राजदूतांनीं संपत्ति नेल्याबद्दल तो फार चिडलेला आहे.

**वर्धमानक** : हें काय घर आहे ? कुठं तो पूर्वीचा राजवाडा अन् कुठं ही धर्मशाळा !

**मैत्रेय** : मूर्खा, माझ्या घराला धर्मशाळा म्हणतोस ?

**वर्धमानक** : हें—हें तुमचं घर ?

**मैत्रेय** : हो हो, हें माझं घर आहे. चारुदत्तांनीं मला दिलेलं आहे ! आज माझं हें घर होतं म्हणून निवाऱ्याला जागा तरी मिळाली. नाहीं तर रस्त्यावर, झाडाखालीं पडावं लागलं असतं भिकाऱ्यासारखं ! म्हणे धर्मशाळा !

**मदनिका** : अंथरायला अन् पांघरायला एक वस्त्र असेल तर शपथ !

**मैत्रेय** : होतं नव्हतं ते सारं लुबाडून नेलं त्या राक्षसांनीं ! नशीब माझं कीं त्यांनीं हा पंचा नेला नाहीं माझा !

**चारुदत्त** : ( देवापुढें ) सर्वे वै सुखिन: सन्तु सर्वे सन्तु निरामया: । सर्वे भद्राणि पश्यन्तु न कश्चित् दु:खभाग् भवेत् ।

**मैत्रेय** : मित्रा, आतां कशाला त्या देवाची पूजा करतो आहेस ? त्या देवाला कांहीं दया असती तर आज कशाला कपाळीं आला असता हा वनवास अन् हें दारिद्य !

**चारुदत्त** : मित्रा, कां विनाकारण मनाचा संताप करून घेतोस ? आजपर्यंत ज्यानं संपत्तीची कधींही पर्वा केली नाहीं, त्याला दारिद्याची काय भीति ? अन् कोण म्हणतो मी दरिद्री आहे म्हणून ?

**मैत्रेय** : तूं दरिद्री नाहींस ? एवढं मोठं घर तुझं राजवाड्यासारखं ! तें सोडून एखाद्या भिकाऱ्यासारखं तुला बाहेर पडावं लागलं. आजपर्यंत भिकाऱ्यांना, पाहुण्यांना अन् मित्रांना आपलं द्रव्य वाटेल तसं वाटून टाकलंस. अन् जें कांहीं थोडं उरलं होतं तें देखील आज राजांनीं लुटून नेलं !

**चारुदत्त** : जाऊं दे रे. तुझ्यासारखा मित्र असतांना मला दरिद्री कोण म्हणेल !

**मैत्रेय** : माझ्यासारखा मित्र—काय फायदा तुला असल्या मित्राचा ! आजपर्यंत तुझ्या घरच्या पंचपक्वान्नांवर यथेच्छ ताव मारून, एखाद्या पोळासारखे आम्ही हिंडत होतों. पण आज तुझ्या या संकटाच्या प्रसंगीं एका कपर्दिकेचं सहाय्य करण्याचं तरी सामर्थ्य आमच्यांत आहे काय ? आम्हीं जगलों काय अन् मेलों काय सारखंच ! ( डोळे पुसूं लागतो. )

**रोहसेन** : ( रडत ) माझा सोन्याचा गाडा—माझा सोन्याचा गाडा—ऽ ऽ

**चारुदत्त** : मुलापासून म्हाताऱ्यापर्यंत साऱ्यांनींच रडायला सुरवात केली आहे घरांत !

**रदनिका** : त्याचा सोन्याचा गाडा राजदूत घेऊन गेले ! ( रोहसेनास ) रडूं नको बाळ ! मी तुला उद्यां मातीचा गाडा करून देईन.

**रोहसेन** : ( रडत ) मला नको मातीचा गाडा—मला सोन्याचाच गाडा पाहिजे.

**चारुदत्त** : त्याला तिकडे नेऊन निजव पाहूं.

रदनिका रोहसेनाला घेऊन आंत जाते.

**मैत्रेय** : हर हर ! सोन्याच्या खेळण्याशिवाय ज्या मुलानं कधीं खेळ खेळला नाहीं, त्याला आतां मातीच्या गाड्याशीं खेळण्याची पाळी यावी !

**चारुदत्त** : ए पुरे कर तुझं रडगाणं ! रेभिला, अरे तूं कां स्वस्थ बसला आहेस—चालूं दे तुझं वीणावादन !

रेभिल वीणा वाजवूं लागतो, तो करुणरसाचे सूर छेडतो.

**चारुदत्त** : बंद कर, बंद कर ते रडके सूर. तुझं देखील या मैत्रेयाप्रमाणं डोकं फिरलं काय ? असे सुंदर सूर वाजव कीं दुःख, यातना, संताप, विषण्णता या साऱ्या दुष्ट भावना इथून पार नाहींशा झाल्या पाहिजेत, आणि हृदय हर्षानें धुंद होऊन त्या वसंतसेनेप्रमाणं थय् थय् थय् थय् नाचत सुटलं पाहिजे !

**मैत्रेय :** म्हणजे एवढं घरदार–संपत्ति गेली त्याचं तुला कांहींच नाहीं? तुझ्या डोक्यांत अजून ती वसंतसेनाच नाचते आहे वाटतं?

**चारुदत्त :** अहाहा! काय तिचं तें सुंदर नृत्य! स्वर्गांतील एखाद्या अप्सरेप्रमाणं नाचत होती ती! किंवा साक्षात् रतीच येऊन नृत्य करीत होती कीं काय, असा भास होत होता.

**मैत्रेय :** ए मित्रा, पाया पडतों. काय वाटेल तें कर, पण त्या नायकिणीच्या पोरीचं वेड घेऊं नकोस. कुंदावांचून कमळ, लुच्चेगिरीवांचून व्यापार, भांडणावांचून खेडेगांव, अन् पैशाच्या लोभावांचून नायकिणी, कधीं कधीं आढळायच्या नाहींत! अन् तशांतून तूं आर्यकाला–( चारुदत्त मैत्रेयाच्या तोंडावर हात ठेवतो ) आर्यकाला राजा करून, अवंतीच्या जनतेला सुखी करण्याची प्रतिज्ञा केली आहेस. या गणिकेच्या नादीं लागलास, तर तुझ्या हातून हें कांहीं होणार नाहीं.

**चारुदत्त :** कोणतीही स्त्री चारुदत्ताच्या कर्तव्याच्या आड कधींही येऊं शकणार नाहीं! ( रेभिलाचा स्वर ऐकून ) शाबास रेभिला, आतां मात्र तूं आपल्या कौशल्याची कमाल केलीस. तुझे हे गोड स्वर थेट हृदयाला जाऊन पोहोंचतात–आणि कसल्यातरी मनोहर आठवणी जाग्या होऊन मनाला धुंद करून टाकतात.

मैत्रेय निघून जातो.

**चारुदत्त :** रुमझुम नाचे बाला, लावण्याची लीला!
जसा फुलांचा मेळा, डोले फुललेला!
नील नभीं कीं नक्षत्रांचा हाले हिंदोळा!
सौंदर्याचा झुलतो झेला,
थयथय नाचे कीं स्वरमाला!

( तिकडे वसंतसेना आपल्या महालांत गात असते )

**वसंतसेना :** हांसत हांसत हा मुरलीवाला,
अवचित आला कुठून अलबेला ?
शृंगाराचा छेल छबेला,
मुलवी भोळी राधावाला,
श्यामल बन्सीवाला !

**चारुदत्त :** चंद्र सखीसह गगनीं आला;
कुठं शोधूं माझी—शीतल चंद्रकला ?

**वसंतसेना :** रूपसुधेचा भरला प्याला,
अहा, बहरली यौवनमाला !
जीव भेटीला वेडा झाला,
प्रेम एक आधार जीवाला !

: : ४

वसंतसेना बाहेर जात असतां मदनिका येते.

**वसंतसेना :** मी आतां जाऊन येते. आईनं विचारलं तर म्हणावं मी देवाला गेलें आहे.

**मदनिका :** कोणत्या देवाला ?

**वसंतसेना :** माझ्या हृदयांतल्या देवाला—

**मदनिका :** पण बाईसाहेब, रात्रीची वेळ आहे ही. हे दागिने कशाला घातलेत एवढे अंगावर—

**वसंतसेना :** वेडे, देवाच्या दर्शनाला जायचं म्हणजे मोकळ्या हातांनीं कां कुणी जातं ?

**मदनिका :** म्हणजे ? हे अलंकार देऊन कां त्या दरिद्री देवाची तुम्ही पूजा करणार आहांत !

**वसंतसेना :** बोलू नकोस मोठ्यानं, आई ऐकेल. अग आजपर्यंत पैशाच्या लोभानं साऱ्या गणिका पुरुषांवर प्रेम करीत असत; पण प्रेमासाठीं आपलं सर्वस्व अर्पण करणारी एक तरी गणिका असूं शकते, हें मला दाखवायचं आहे.

( गुणगुणते ) प्रेम एक आधार जिवाला—

वसंतसेना जाते.

**मदनिका :** ( गात ) प्रेम एक आधार जिवाला—

**शर्विलक :** ( लपून बसलेल्या जागेंतून ) हां हां हां—

**मदनिका :** ( कानोसा घेऊन ) हां हां हां—

**शर्विलक :** ( बाहेर येऊन ) हां हां हां—

**मदनिका :** कोण शर्विलक, तूं कसा इथं ?

**शर्विलक :** तुझ्यासाठीं, मदनिके, तुझ्यासाठीं ! तुझ्या दासीपणांतून तुला मोकळं करून तुझ्याशीं लग्न लावल्यावांचून मी कधींहि सुखी होणार नाहीं !

**मदनिका :** पण माझ्या धनिणीला द्यायला द्रव्य कुठून आणणार तूं ?

**शर्विलक :** तें तुला काय करायचंय् ? उद्यां सूर्यास्ताच्या आंत तुझ्या दास्यांतून तुझी मुक्तता केली म्हणजे झालं ना ?

**मदनिका :** कांहीं तरी भलतंसलतं करायचा तर तुझा विचार नाहीं ना ?

**शर्विलक :** साहसावांचून कां संपत्ति मिळते लाडके ?

आंतून 'मदनिके-मदनिके' अशी रंभेची हांक ऐकूं येते.

**मदनिका :** थोरल्या बाईसाहेब हाक मारताहेत. जा तूं, उद्यां रात्रीं ये.

शर्विलक जातो. रंभा येते.

**रंभा :** मदनिके, वसंतसेना कुठं आहे ?

**मदनिका :** ह्या काय आत्तां इथं होत्या कीं ! बाईसाहेब–अहो बाईसाहेब– ( आश्चर्यानें ) अं इतक्यांत कुठं गेल्या या—

**वसंतसेना :** तूं कुणाशीं बोलत होतीस आत्तां इथं !

**मदनिका :** बरोबर–बरोबर–त्या आपल्या शयनगृहांत असतील बरं कां !

**रंभा :** इतक्यांत म्हणालीस ती बागेंत आहे. अन् आतां म्हणतेस ती शयनगृहांत असेल. मदनिके, इकडे ये बघूं. तुला काय वाटतं मी बोळ्यानं दूध पिते ? हे–हे तुमचं न समजण्या इतकी मूर्ख आहे होय मी ? अग, ज्या गांवच्या बोरी त्याच गांवच्या बाभळी. या तरुणपणांतल्या भानगडी करतां करतां हे माझे काळयाचे पांढरे झाले आहेत–अन् आतांही कलप लावून मी तेवढ्यासाठींच यांना पांढऱ्याचे काळे करते आहे. त्या दिवशीं कामदेवाच्या देवळांत या पोरीचे ते चाळे पाहिल्यावर मी तिचं सारं लक्षण ओळखलं. बोल, ती त्या चारुदत्ताला भेटायला गेली आहे ना ? ( मदनिका बोलत नाहीं ) नको सांगूस. नको सांगूस. येऊं दे तर खरं तिला परत, म्हणजे अशी काढते तिची.

बडबडत जाते.

: : ५

चारुदत्त ओटीवर येतो. मैत्रेयाला डुलकी लागलेली आहे.

**चारुदत्त :** मैत्रेया-मैत्रेया—

**मैत्रेय :** ( दचकून उठतो ) कोण ! आपण—

**चारुदत्त :** हो–

**मैत्रेय :** काय, झाला जप ?

**चारुदत्त :** हो, हा मातृदेवतांचा बळी तेवढा बाहेर टाकून ये बघूं.

: : ६

मैत्रेयाच्या घराच्या पाठीमागच्या बाजूस एका रस्त्यावर शकार, चेट आणि विट हिंडत आहेत. चेटाच्या हातांत दिवटी आहे.

**चेट :** खरंच सांगतों महाराज, वसंतसेना घरीं नाहीं. बोलून चालून ती आपली ही. रात्रीं घरीं कशी आढळणार ?

**शकार :** नाहींतर ती चारुदत्ताच्या घरीं गेली अशेल.

**विट :** महाराज, नायकिणी कां कधीं दरिद्री माणसाच्या घरीं जातील ?

**शकार :** काय शांगू विटा, विस्तवावर माशाचा तुकडा जशा करपतो, तशा माझा जीव त्या वशंतशेनेनं करपवून टाकला आहे रे ! चल आत्तांच्या आत्तां तिला शोधून काढूं या !

**विट :** पण महाराज, आपण आर्यकाला पकडायला निघालों आहोंत ना ?

**शकार :** मरूं दे तो आर्यक—अरे, पुरुषाला पकडायला एवढी घाई कशाला ? आधीं वशंतशेनेला पकडूं-अन् मग आर्यकाच्या मागें लागूं. आज जर ती नाहीं शापडली, तर मला झोप येणार नाहीं रे. ( कोपऱ्यावर वसंतसेना वळल्यासारखी दिसते ) ती बघ वशंतशेना.

**विट :** नसेल महाराज, दुसरी कोणी तरी असावी ती.

**शकार :** दुशरी नाहीं न् तीशरी नाहीं. वशंतशेनाच आहे ती ! खाश-पळा !

ते धावत जातात. वसंतसेना दुसऱ्या एका कोपऱ्यावर लगबगीनें जातांना दिसते. चेट आणि विट दुसऱ्याच बाईकडे बघत असतात.

**चेट :** अरे, ती बघ वसंतसेना—

**विट** : छट् ती बघ—

**शकार** : आंधळ्यांनो, ती बघा वशंतशेना ! ( जातात )

: : ७

शकार , विट, चेट वसंतसेनेचा पाठलाग करीत आहेत. शकाराला वसंतसेना मधेंच दिसते. त्या गडबडीत विटाचा धक्का लागून चेट पडतो.

: : ८

मैत्रेय दिवटी व बळी घेऊन बाहेर येतो. वसंतसेना तेथें येतें व चटकन् फुंकर घालून दिवा विझवते व घरांत शिरते.

**मैत्रेय** : अरे—अरे, काय वारा आहे तरी !

इतक्यांत शकार मैत्रेयाचा हात वसंतसेनेचा हात आहे असें समजून पकडतो.

**शकार** : आतां शापडलीस कीं नाहीं ?

**मैत्रेय** : शापडलीस, शापडलीस काय ? अरे, मी बाई नाहीं म्हातारा आहे !

इतक्यांत चेट पाठीमागून दिवटी घेऊन येतो.

**शकार** : ( उजेडांत ) ऑं ऽ मला वाटलं वसंतशेनाच माझ्या हातांत आली—पण हा कोण ? विटा, मग ती वशंतशेना कुठं गेली रे ?

**विट** : आंत लपली असेल महाराज !

**शकार** : अशं ! ए थेरड्या बाजूला शर. आम्हाला आंत जाऊंद्या !

**मैत्रेय** : म्हटलं, हें गरीब ब्राह्मणाचं घर आहे, येथें वसंतसेना येते कशाला मरायला !

**शकार** : ए भटुरग्या, मी राजाचा मेहुणा आहे. माझ्याशी दांडगाई करशील तर अडकित्त्यानं शुपारी फोडावी तसं मी तुझं डोकं कचकन् फोडीन.

**मैत्रेय** : कचकन् फोडीन ! तूं पाऊल तर पुढें टाक, कीं हा सोटा तुझ्या डोक्यांत घालून त्याची सुपारीसारखी खांडं करून टाकतो. ( सोटा उगारतो )

**शकार** : थांब थांब. जरा थांब ! विटा, याला क्षमा करावी कां रे ?

**विट** : करावी महाराज, ब्राह्मण आहे—

**चेट** : गरीब आहे—

**शकार** : ठीक, तूं ब्राह्मण आहेस म्हणून तुला आम्ही क्षमा करतो. आम्ही राजे लोक ब्राह्मणाशीं लढत नसतो. चला रे—

निघून जातात.

: : ९

चारुदत्त वरून खालीं येतो. वसंतसेना अंधारांत उभी आहे।

**चारुदत्त** : रदनिके, आज हवेंत थोडा गारवा आहे नाहीं ? हें बघ, हा शेला रोहसेनाच्या अंगावर घाल. त्याला थंडी वाजत असेल. ( शेला वसंतसेनेच्या अंगावर टाकतो. त्याला जाईच्या फुलाचा वास लावलेला असतो. ती शेला मोठ्या प्रेमानें हुंगते )

**चारुदत्त** : म्हणजे, अजून तूं इथंच—

**वसंतसेना** : ( पुढें येऊन ) मी वसंतसेना आहे.

**चारुदत्त** : वसंतसेना ? वसंतसेना ! तूं इथं ?

**वसंतसेना** : मला माहीत नाहीं, आपण इथं राहायला आलांत !

**चारुदत्त** : अस्सं–मला वाटलंच तूं गैरसमजानं इथं आली असली पाहिजेस !

**वसंतसेना** : तसं नाहीं आर्या, तसं नाहीं. मी देवदर्शनाला निघालें होतें तों वाटेंत शकारानं अन् त्याच्या सेवकांनीं मला पाहिलं. अन् ते माझ्या मागं लागले.

**चारुदत्त** : आणि मग—

**वसंतसेना** : मी भिऊन पळत सुटलें, अन् आश्रयासाठीं म्हणून या घरांत शिरलें–इथं आल्यावर आपल्याला पाहिलं. खरोखरच माझं नशीब थोर म्हणून त्यानं मला इथं आणलं !

**चारुदत्त** : भगवान् कामदेवाची ही कृपाच म्हटली पाहिजे !

**वसंतसेना** : काल मंदिरांत माझी त्या दुष्टापासून सुटका केलीत, अन् या घरनं त्याच्यापासून माझं संरक्षण केलं. तुमचे उपकार मी कसे फेडूं ?

पाया पडूं लागते.

**चारुदत्त** : वसंतसेने, तूंच आपल्या सौंदर्याचं फिरून दर्शन देऊन मला उपकृत केलं आहेस. ( तिच्या पाया पडूं लागतो. )

**मैत्रेय** : ( येऊन ) ए, अरे झालंय् काय तुम्हांला, एकमेकांच्या पाया पडायला ? अहो बाई, अशा वेळीं आम्हां गृहस्थांच्या घरांत येणं तुम्हांला शोभत नाहीं.

**वसंतसेना** : रागावूं नका, जातें मी. पण आर्या ! माझी एक विनंति आहे.

**चारुदत्त** : काय—

**मैत्रेय** : क्याय काय ?

**वसंतसेना** : हे माझे अलंकार तुमच्याजवळ ठेवावेत, नाहीं तर तो दुष्ट शकार माझ्या घरीं येऊन हे घेऊन जायचा—

**चारुदत्त** : असले बहुमोल अलंकार ठेवायला हें घर योग्य नाहीं !

**वसंतसेना** : माणूस पाहून विश्वास ठेवतात, घर पाहून नाहीं !

**चारुदत्त** : जशी तुझी इच्छा ! मैत्रेया, हे अलंकार मोजून घे.

**मैत्रेय** : अरे घेतो, पण हे बांधायचे कशांत ?

**चारुदत्त** : काढ तुझा पंचा.

**मैत्रेय** : माझा पंचा काढूं म्हणतोस ? ( पंचा उलगडतो व लगेच झांकतो. ) या क्षुद्र दागिन्यासाठीं माझ्या पंचाची घडी मोडूं कीं काय ?

**चारुदत्त** : काय पण तुझा पंचा ! नुसती चाळण झाली असेल त्याची.

**मैत्रेय** : अरे बाबा, फाटक्या वस्त्राची अब्रू घडी केली म्हणजे शाबूत राहते. राहूं दे हा असाच, गुंडाळतो याच्यांत. पण काय हो, हे सारे दागिने खरेच आहेत ना ? कां आपलं हूं ? ( शर्विलक बाहेरून ऐकतो. ) अबबब, किती आहेत हे अलंकार ? अन् हे जड जड किती लागतात ? छेः छेः, यापैकीं एकाचं नांव मला माहीत असेल तर शपथ ! आम्हीं बोलून चालून ब्रह्मचारी— आम्हांला बायकाच माहीत नाहींत, तर मग बायकांचे दागिने कुठून माहीत असणार ?

**वसंतसेना** : आपण—आपली आज्ञा होईल तर मी यांनाच बरोबर घेऊन घरीं जातें.

**मैत्रेय** : काय मला ? हरे राम—म्हणजे काय देखावा दिसेल म्हणतां ? पुढं तुम्ही एखाद्या राजहंसीप्रमाणं चालाल छुमछुम करीत ऐटीनं—अन् मागून मी येईन लंगडत लंगडत एखाद्या पिसं झडलेल्या डोमकावळ्याप्रमाणं—लोक मला धोंडे मारतील धोंडे !

**चारुदत्त** : नाहींतर मीच स्वतः हिच्याबरोबर जातो—वर्धमानका—

**वर्धमानक** : ओ ऽ ऽ

**चारुदत्त** : दिवटी पेटव.

**मैत्रेय** : पेटव, पेटव बाबा ! तेलावांचून दिवटी पेटवण्याची युक्ति तुला माहीत असेल तर अवश्य पेटव !

**चारुदत्त** : जाऊं दे नाहींतर ! नकोच ती दिवटी. अन् शिवाय आता चंद्रोदयही झाला आहे. ( वसंतसेनेस ) चला—

**मैत्रेय** : ( वसंतसेनेस ) काय—

वसंतसेना नमस्कार करते.

**मैत्रेय** : अष्टपुत्रा—

**वसंतसेना** : इश्श !

**मैत्रेय** : चुकलों–चुकलों–तुम्हाला असला आशीर्वाद द्यायचा नसतो नाहीं कां ! अखंड सौभाग्यवती व्हा ! मित्रा, लवकर परत ये. उशीर करूं नकोस. नाहीं तर आकाशांत चंद्र उगवला आहे, बरोबर आहे वसंतसेना अन् तुम्ही पडलांत रसिक; सारी रात्र बाहेर भटकत बसाल, अन् इथं या जुनाट पडक्या घरांत, हे दागिने संभाळण्यासाठीं मला सारी रात्र जागत बसांव लागेल काय हं—

चारुदत्त 'कांहीं काळजी करूं नको' अशा आविर्भावानें हंसत वसंतसेने-बरोबर जातो.

: : १०

आकाशांत पूर्ण चंद्र उगवला आहे. चारुदत्त वसंतसेनेच्या समवेत तिच्या घराकडे चालला आहे. चारुदत्ताचें हृदय वसंतसेनेवरील प्रेमामुळें उचंबळत आहे. वसंतसेनाही आनंदाच्या सागरांत पोहत आहे.

**चारुदत्त** : हा उदयाला नभीं चंद्रमा आला !
कुणी हा रजतरसाचा प्याला ओतला !
शुभ्र उधळला चुरा फुलांचा,
तुषार पाऊस झरे दुधाचा !

**वसंतसेना** : मोत्यांचा हा उडे हजारा !

दिशां दिशांतुनि अमृतधारा,

नाथ निशेचा–नक्षत्रांचा–हांसत हा आला !

**चारुदत्त :** प्रणयि जनांचा त्राता पातला !

महापूर हा—पहा लोटला

प्रेमसागराला !

**वसंतसेना :** जळांत फुलला—चंद्रविकासीं

कमळांचा मेळा !

**चारुदत्त :** प्रीतिरसानें जो तो रंगला !

चकोर नाचति पहा प्रेमवेडे !

**वसंतसेना :** चंद्रकांत मनिं पाझरती तिकडे !

**चारुदत्त :** नाचति तारा—

**वसंतसेना :** सैरावैरा—

**चारुदत्त :** नाचतसे वारा—

**दोघे :** जीव जिवाला–आतां भेटला !

## : : ११

गाणें म्हणत म्हणत तीं दोघें वसंतसेनेच्या मागील बगीच्यांत येऊन पोहोंचतात.

**वसंतसेना :** आर्या—

**चारुदत्त :** वसंतसेने—

**वसंतसेना :** जाऊं मी ?

**चारुदत्त :** अं हं—

**वसंतसेना :** काय म्हणालांत ?

**चारुदत्त** : म्हणालों मी कांहीं ? कांहीं नाहीं !

**वसंतसेना** : पुनः कधीं दर्शन होईल ?

**चारुदत्त** : दर्शन होईल पुनः जेव्हां तूं आकाशांत उगवशील तेव्हां !

**वसंतसेना** : कांहीं तरीच—जातें मी.

**चारुदत्त** : मघांशी इथं येतांना दोन चंद्र बरोबर होते. आतां घरीं परत जातांना मात्र एकाच चंद्राची सोबत राहील !

ती जाते. तो तिच्याकडे पाहात राहातो.

## : : १२

मैत्रेयाच्या घराच्या भितीला शर्विलकानें 'पूर्णकुंभ' आकाराचें भोंक पाडलें आहे. तो बाहेरून उडी मारून आंत जातो. तेथें वर्धमानक, रेभिल झोपलेले आहेत. शर्विलक चापसूं लागतो; तों वीणेच्या तारेला त्याचा पाय लागतो व त्यांतून नाद निघतो; तसा तो दचकून नाद थांबवतो व मैत्रेय झोपला आहे त्याच्याजवळ जातो. मैत्रेयानें पंचांत गुंडाळलेले दागिने छातीवर ठेवलेले आहेत.

**मैत्रेय** : ( झोपेंत ) अरे, हे दागिने तूं सांभाळ, तुला गाई ब्राह्मणाची शपथ आहे. नाहींतर मला झोप यायची नाहीं !

हातांतले दागिने पुढें करतो. शर्विलक ते दागिने घेतो.

**शर्विलक** : ( जातां जातां ) महाब्राह्मणा, आतां शंभर वर्षें खुशाल निजून राहा !

शर्विलक भोकांतून दागिने घेऊन बाहेर पडतो, तोंच चारुदत्त तिथें येतों.

**चारुदत्त** : (भगदाड बघून) सुंदर ! चौर्यकर्मांतही किती कुशलता असतें. अरे मैत्रेया , रेभिला, वर्धमानका, रदनिके—

**मैत्रेय** : ( भोंकांतून बाहेर येतो ) अरे, काय झालं काय ओरडायला—

**चारुदत्त** : मित्रा, ज्या कुणा चोरानं या भिंतीला हें डौलदार भगदाड पाडलं आहे, तो चांगलाच कलावंत चोर दिसतो आहे.

**मैत्रेय** : भगदाड–कुठं आहे ?

**चारुदत्त** : ( दाखवित ) हें काय ?

**मैत्रेय** : आं ऽ आपल्या घराच्या भिंतीला भोंक पाडून आपल्या घरांत चोर शिरला कीं काय ? अरे बापरे–अन् दागिने—( आंत जातो. )

**चारुदत्त** : मला वाईट वाटतं तें एवढंच कीं, त्या बिचाऱ्याला या घरांतून निराश होऊन परत जावं लागलं असेल.

**मैत्रेय** : ( बाहेर येत ) मित्रा ! माझा पंचा चोरीला गेला–नेला त्या चोरांनीं. नुसता पंचाच नाहीं तर दागिने देखील चोरीला गेले. चांगले त्या पंचांत बांधले कीं रे होते !

**चारुदत्त** : काय म्हणतोस, दागिने गेले–फार आनंदाची गोष्ट आहे.

**मैत्रेय** : आं ?

**चारुदत्त** : चोर आपल्या घरांतून कृतार्थ होऊन गेला !

**मैत्रेय** : अरे, पण ती दुसऱ्याची ठेव होती ना ?

**चारुदत्त** : अरेरे ! हे माझ्या ध्यानांतच आलं नाहीं. आतां मात्र पुरता घात झाला. माझ्या दारिद्र्यामुळं मी कितीही जीव तोडून खरं सांगण्याचा प्रयत्न केला तरी कोणीही माझ्यावर विश्वास ठेवणार नाहीं. माझी सारी संपत्ति गेली तरी त्याची मी पर्वा केली नाहीं; पण माझ्या निर्मल चारित्र्याला लांछन लागलं तर माझे प्राण कासावीस होतील.

**मैयेत्र** : अरे मित्रा, आठवलं मला ! नायकिणीचे दागिने परत न करणं हे पाप नाहीं.

**वर्धमानक** : अं ?

**मैत्रेय** : असं शास्त्रवचन आहे.

**वर्धमानक** : कुठं ?

**मैत्रेय** : आहे कुठं तरी हो.

**चारुदत्त** : छेः छेः ! असलं पाप कालत्रयींही माझ्या हातून होणार नाहीं. त्यापेक्षां एकाद्या भिकाऱ्यासारखा दारोदार भटकून मी भीक मागेन आणि वसंतसेनेचं ऋण फेडून मुक्त होईन. (गळा चापसून) अरे, ही बहुमोल रत्नमाला माझ्याजवळ आहे हें मी विसरूनच गेलों होतों.

**मैत्रेय** : म्हणजे तुझ्या मृत पत्नीनं तुला दिलेली ही बहुमोल आठवण तूं त्या नायकिणीला देऊन टाकणार कीं काय ? कुठं ते क्षुद्र दागिने अन् कुठं ही पृथ्वीमोलाची रत्नमाला !

**चारुदत्त** : ही तिच्या दागिन्याची किंमत नाहीं ! तिनं माझ्यावर जो विश्वास ठेवला त्याची किंमत आहे.

सर्वजण त्याच्याकडे पहात राहतात.

## : : १३

सकाळची वेळ. वसंतसेनेच्या वाड्यांतील तिचा नृत्यमहाल. एका बाजूला चित्रफलक आहे. त्यावर वसंतसेना चारुदत्ताचें चित्र रंगवीत आहे. चित्र रंगवितांना ती गाणें म्हणत आहे.

याहो, याहो, सख्या मनमोहना !
हांसत नाचत धांवत या ना,
प्रीतिच्या भगवाना !

रुप देखणें गोजिरवाणें,
नाचे गालीं गोड चांदणें,
ओंठ प्रीतीचें गाती गाणें,
भासे मुरलीवाला कान्हा !
चांद हांसरा तूं नि मी तारा,
प्रणयमेघ तूं मी धारा;
नयनशरांचा चालव मारा,
व्याकुल कर मदना रे
माझ्या प्राणा !

**मदनिका** : ( मागून येऊन ) आर्य चारुदत्त वाटतं !

**वसंतसेना** : ( दचकते ) काय वात्रट आहेस ! केवढ्यांदा मी दचकलें—काय म्हणालीस तूं !

**मदनिका** : म्हटलं, मूर्तिमंत चारुदत्तांची प्रतिमा आहे ही !

**वसंतसेना** : चल, चावट कुठली !

**मदनिका** : कसं ओळखलं म्हटलं तुमचं रहस्य !

**वसंतसेना** : हें ग काय मदनिके, मला चिडवतेस ! थांब, तुझ्या तोंडाला हा रंग फासते, म्हणजे ताळ्यावर येशील ! ( तिला डिवचित ) चिडवशील—चिडवशील, चिडवशील मला फिरून—

आंतून एक दासी येते. चेट व दोन नोकर सोन्याची ताटें घेऊन येतात. एका ताटांत रत्नजडीत अलंकार आहेत व दुसऱ्या ताटांत निरनिराळीं फळें आहेत.

**चेट** : ( अदबीनें ) राजशालक संस्थानकांनीं हे बहुमोल अलंकार अन् फळं भेट म्हणून आपल्याला पाठवलीं आहेत.

**वसंतसेना** : ( चिडून ) माधविके ! यांना आंत कुणी येऊं दिलं ?

**माधविका** : आईसाहेबानीं.

**वसंतसेना** : ( ताटं झुगारून देते. फळें व दागिनें सांडतात ) चला, चालते व्हा इथून ! त्या दुष्ट शकाराचं कांहीं एक नको मला ! आई, आई–थांबा अशीच्या अशी जाऊन आईची चांगली खरडपट्टी काढते–आई ! आई !आई—

रंभेच्या महालांत रागारागानें जाते.

**रंभा** : काय, ओरडायला काय झालं एवढ्या मोठ्यानं ?

**वसंतसेना** : हजार वेळां तुला सांगितलं कीं, त्या मेल्या शकाराचं कांहीं एक नको मला. त्यांनीं पाठवलेली एक जिन्नस या घरांत येतां कामा नये. त्याच्या नोकर माणसांनीं पाऊल टाकतां कामा नये आपल्या इथं. एवढंच काय, पण त्याचं तोंड पहाण्याची इच्छा नाहीं, इतकी चीड आहे मला त्या मेल्याची. असं असून त्याचे ते लोचट नोकर खुशाल फळं अन् दागिने घेऊन आपलें माझ्या समोर येतात. अशी आग आग झाली आहे माझ्या अंगाची !

**रंभा** : थांबू नकोस. बोल, बोल जेवढं तुला बोलून घ्यायचं तेवढं एकदाचं बोलून घे. नाहीं तर मार मला ! आजपर्यंत तुला लहानाची मोठी केली–वाढवली, शिकवली, तुझे लाड केले—राजाच्या मुलीला हेवा वाटेल इतक्या सुखांत तुला ठेवली—त्याचे चांगले उपकार फेडलेस बरं बाई !

**वसंतसेना** : तसं नाहीं आई—तूं ऐक तर खरं.

**रंभा** : मला ठाऊक आहे, हें–हें–तुझं तारुण्य बोलतंय् तारुण्य ! मुली तरुण वयांत आल्या कीं आपले आईबाप त्यांना दिसेनासे होतात हेच खरं !

**वसंतसेना** : पण मला जर त्या माणसाचा इतका तिरस्कार आहे, तर तुझा तरी एवढा आग्रह कां ?

**रंभा** : एवढे मोठे राजशालक ते—रूप, धन, अधिकार कशांत कांहीं कमी आहे कां त्यांना ? त्यांचा तिरस्कार करायला झालं काय तुला ?

**वसंतसेना** : पण, मला नाहीं आवडत तो—

**रंभा** : मग आवडतं तरी कोण तुला ? तो चारुदत्त होय ? त्याच्यावर प्रेम बसलं काय तुझं ! मूर्ख कुठली ! नायकिणीच्या मुली एका पुरुषावर प्रेम करायला लागल्या तर जग हंसेल आपल्याला—

**वसंतसेना** : सारं जग हसलं म्हणून मला काय त्याची परवा ?

## : : १४

वसंतसेनेच्या महालांतील एक दालन. शर्विलक दबकत दबकत आंत येतो; मदनिकेला पाहून तो टाळी वाजवतो.

**शर्विलक** : ( हलकेच ) मदनिके—

**मदनिका** : कोण शर्विलक ! इथं कशाला आलास—बाईसाहेबांनीं पाहिलं म्हणजे—

**शर्विलक** : त्यांनाच भेटायला आलों आहे मी ! हें द्रव्य मी आतां त्यांना देणार अन् तुझी दासीपणांतून सुटका करणार.

**मदनिका** : कुठून आणलेस हे एवढे बहुमोल दागिने ?

## : : १५

रंभेचा महाल

**रंभा** : पण मी म्हणतें तूं त्याच्यासाठीं वेडी झालीस म्हणून तो कां तुझ्यावर प्रेम करणार आहे ? नायकिणीच्या मुलीवर प्रेम करण्याइतका चारुदत्त मूर्ख नाहीं !

**वसंतसेना :** तुला काय ठाऊक ते कसे आहेत ते ? खरंच आई, ते इतके चांगले आहेत, इतके उदार आहेत, इतके प्रेमळ आहेत—छेः बाई, मला लाज वाटते ( लाजून पळते. )

**रंभा :** खास, कांहींतरी बाधा झाली आहे पोरीला !

: : १६

मदनिका आणि शार्विलक दालनांत बोलत आहेत.

**शार्विलक :** ( कानांत कांहींतरी सांगतो )

**मदनिका :** काय चोरी केलीस, शार्विलका, किती वाईट आहेस तूं !

हें बोलणें चालू असतां वसंतसेना जिन्यावर येते व थबकते.

**शार्विलक :** मग, मदनिके तूं नाहीं कां माझ्या हृदयाची चोरी केलीस ? सगळ्याच चोऱ्या कांहीं वाईट नसतात. आर्यकाला राजा करण्यासाठीं देखील आम्ही असंच द्रव्य जमवतों—समजलीस—पाहिलंस कसे सुंदर आहेत हे अलंकार !

**मदनिका :** अगबाई, हे तर आमच्या बाईसाहेबांचे अलंकार ! कालच त्यांनीं हे चारुदत्तांच्याकडे ठेवायला दिले होते !

**शार्विलक :** काय म्हणतेस ! हरे राम राम राम—म्हणजे काय ? ज्या घरांत मी चोरी केली तेथें सध्या आर्य चारुदत्त राहात आहेत कीं काय ?

**मदनिका :** चांडाळा, त्यांच्या जिवाला अपाय तर कांहीं केला नाहींस ?

**शार्विलक :** छेः छेः, असं माझ्या हातून कसं होईल ? ( मदनिका निःश्वास टाकते. वसंतसेनाही समाधानाचा निःश्वास टाकते. ) अरेरे, फार वाईट कृत्य झालं हें !

**मदनिका :** हें बघ आतां दुःख करण्यांत अर्थ नाहीं—आतां बाईसाहेब येतील—इकडे—कान कर. ( *त्याच्या कानांत कांहीं तरी सांगते* ) असं करायचं.

**शर्विलक** : किती हुषार आहेस तूं !

**मदनिका** : सोंग मात्र उत्तम झालं पाहिजे. ( वसंतसेना खोकते ) आल्याच बाईसाहेब. बाईसाहेब, ( वसंतसेना खालीं येते. ) श्रेष्ठ चारुदत्ताकडून हे निरोप घेऊन आले आहेत.

**वसंतसेना** : ( मनांत हंसून ) अस्सं, या आर्या, आपलं स्वागत असो !

**शर्विलक** : आपलं कल्याण असो.

**वसंतसेना** : आर्यांची प्रकृति ठीक आहे ना ?

**शर्विलक** : चारुदत्तांची ना ? बरी आहे; दोनतीन दिवस मात्र खोकल्यानं जरा आजारी आहेत ते !

वसंतसेना हंसते. मदनिका शर्विलकाकडे रोखून पहाते.

**शर्विलक** : खोकला नाहीं इतका, पण आपलं पडसं—थंडी—हवा चमत्कारिक पडली आहे नाहीं ?

**वसंतसेना** : आर्यांचा मुलगा कसा आहे ?

**शर्विलक** : मुलगा ? ( घाबरून ) म्हणजे कोणता मुलगा म्हणता ? ( मदनिका गर्भगाळित होते. )

**वसंतसेना** : असं काय करतां ? त्यांना एकच मुलगा नाहीं कीं ?

**शर्विलक** : असं असं ! म्हणजे त्यांचा तो मुलगा म्हणता होय ! तो तर फार मजेंत आहे ! उड्या काय मारतो–खेळतो काय गुलाम ! वा–वा—

**वसंतसेना** : बरं पण, तुमचं काम काय आहे ?

**शर्विलक** : काम ? हो हो, काम ना–काम असं आहे कीं आर्यांनीं हे तुमचे दागिनें परत करायला सांगितलेत मला !

**वसंतसेना** : ते कां ? त्यांना खोकला झालाय म्हणून ?

**शर्विलक** : हो–नाहीं नाहीं, तसं नाहीं—पण ते म्हणाले, हल्लीचे दिवस फार वाईट आहेत. गांवांत चोर लोक फार शिरले आहेत. शिवाय ते ज्या नवीन

घरांत रहायला आले आहेत, तें मोडकळीला आलेलं आहे. सहज कुणी एकादा चोर घरांत शिरला अन् त्यानं हे दागिनें पळवून नेले तर करतां काय ?

**वसंतसेना** : बरोबर आहे तुमचं म्हणणं ! मदनिके हे दागिने, आंत नेऊन माझ्या पेटींत ठेव आणि इकडे ये बघूं तूं. हे बघ, यांच्याबरोबर जायची तयारी कर.

**दोघे** : म्हणजे काय ?

**वसंतसेना** : तुम्हाला माहीत नाहीं ? अहो, आर्य चारुदत्तांनीं मला आधींच सांगून ठेवलेलं आहे, कीं जो माणूस हे अलंकार घेऊन येईल, त्याला तूं आपली ही दासी मदनिका देऊन टाक म्हणून. ( दोघे तिचे पाय धरतात )

**शर्विलक** : अगदीं शरण आहे तुम्हांला ! खोटं बोलल्याबद्दल क्षमा करा !

**वसंतसेना** : उठा, वेडे कुठले ! मनुष्य प्रेमांत पडलं म्हणजे त्याला पुष्कळ वेळां खोटं बोलावं लागतं असं म्हणतात तें अगदीं खरं आहे.

बाहेर दवंडीची झांजट वाजते.

: : १७

**राजदूत** : पौरजनहो, ऐका हो ऐका. पालक राजाचा शत्रु जो गोपालपुत्र आर्यक, त्याला आज राजदूतांनीं पकडून बंदिशाळेंत टाकलं आहे. आणि आर्यकाला जो कोणी सहाय्य करील त्यालाही बंदिशाळेंत टाकलं जाईल होऽऽ !

: : १८

**शर्विलक** : माझा मित्र आर्यक, त्या दुष्ट पालकाच्या हातीं सांपडला आणि

त्याला बंदिशाळेंत टाकलं ! बाईसाहेब, आतांच्या आतां मला त्याच्या सहायाला गेलं पाहिजे; तोपर्यंत तुम्ही माझ्या मदनिकेला सांभाळा !

**वसंतसेना** : तुम्ही त्याबद्दल अगदीं निर्धास्त असा—

**मदनिका** : ( रडत ) मात्र जिवावर बेतेल असं साहस करूं नका.

**शार्विलक** : स्वर्गपाताळ हलवीन, पण माझ्या मित्राची सुटका केल्यावांचून राहणार नाहीं.

त्वेषानें जातो. मदनिका रडूं लागते. वसंतसेना तिची मान आपल्या खांद्यावर टाकून तिला समजावत जाऊं लागते.

: : १९

**१ द्यूतकार** : ए. आतां द्यूत पुरे ! आर्यकाला बंदिशाळेंत टाकलं अन् आतां द्यूत कसले खेळतां !

**२ द्यूतकार** : अरे, कोणी तुरुंगांत जावो कीं कोणी मरो, द्यूत कधींही थांबत नाहीं. ( सारे हंसतात )

**३ द्यूतकार** : खरोखर द्यूताचा अन् स्त्रीचा ज्याला कधीं मोह नाहीं असा माणूस कुणी जगांत असेल कां !

**१ द्यूतकार** : आहे !

**बाकीचे द्यूतकार** : कोण ?

**१ द्यूतकर** : अर्थात् चारुदत्त !

**२ द्यूतकार** : म्हणजे ? तो भिकारडा चारुदत्त ! द्यूत न खेळतांच जो घरदार गमावून दरिद्री झाला तो !

**३ द्यूतकार** : अरे, त्यांनीं आपली वसंतसेना पाहिली नसेल अजून, नाहीं तर आज तो इथं कुत्र्यासारखा लोळत पडला असता !

**१ द्यूतकार** : शक्य नाहीं ! चारुदत्त जन्मांत कधीं द्यूत खेळणार नाहीं किंवा वसंतसेनेच्या घराची पायरी चढणार नाहीं !

**२ द्यूतकार** : दहा मोहरांची पैज. चारुदत्त आज ना उद्यां येथें आल्यावांचून राहणार नाहीं.

**१ द्यूतकार** : ठरलं ! दहा मोहरांची पैज—चारुदत्त या घराचं तोंड पहाणार नाहीं !

एक दासी येते.

**दासी** : बाईसाहेब—बाईसाहेब—आर्य चारुदत्त आले—कुठं आहेत बाईसाहेब ?

**२ द्यूतकार** : ( पहिल्यास ) टाक दहा मोहरा.

**१ द्यूतकार** : पाया पडतो—मजजवळ कवडीही नाहीं.

**बाकीचे द्यूतकार** : अरे चोरा—

त्याला मारतात; तो ओरडतो. वसंतसेना घाईघाईनें येते.

**वसंतसेना** : काय चालवलं आहे हें ! हें माझं घर आहे, रस्ता नाहीं !

**२ द्यूतकार** : माझ्या दहा मोहरा देत नाहीं हा—

**३ द्यूतकार** : हा म्हणाला, चारुदत्त इथं येणार नाहीं !

**२ द्यूतकार** : अन् मी म्हणालों, चारुदत्त येणार !

**वसंतसेना** : हो ? अन् मग ?

**२ द्यूतकार** : मी पैज जिंकली, चारुदत्त आले !

**वसंतसेना** : आले ? चारुदत्त आले ? कुठं आहेत ?

**२ द्यूतकार** : ते काय येताहेत !

चारुदत्त व मैत्रेय येतांना दिसतात.

**वसंतसेना** : ( गळ्यांतील मोत्याची माळ त्याच्या अंगावर टाकून ) हे घ्या अन् चालते व्हा इथून !

द्यूतकार जातात.

**वसंतसेना** : चारुदत्त आले—अग मदनिके, माधविके, परभृतिके, अग चारुदत्त आले, बसलात काय !

ती आपल्या मोराला आणि हरणाला सांगते, 'चारुदत्त आले!' रंभेच्या महालांत धांवत जाते.

**वसंतसेना** : अग आई, चारुदत्त आले !

**रंभा** : काय वेड लागलंय् काय तुला ?

**वसंतसेना** : हो हो वेडच लागलंय् ! कां नाहीं लागणार – चारुदत्त आले ना ?

जिन्यावरून, महालांतून, बागेतून धांवत धांवत चारुदत्ताला सामोरी जाते.

**वसंतसेना** : आलांत ! स्वागत असो आर्या !

**चारुदत्त–मैत्रेय** : कल्याण !

चारुदत्त आणि मैत्रेय वसंतसेनेच्या महालांत जातात.

**चारुदत्त** : ( वाटेंत द्यूतसाहित्य बघून ) कोण, तूं द्यूत खेळतेस ?

**वसंतसेना** : छेः छेः, मी नाहीं. माझी आई खेळते. तिच्याकडे पुष्कळ द्यूतकार येतात. मला स्वतःला द्यूताचा फार तिरस्कार आहे.

**चारुदत्त** : मग तूं माझा देखील तिरस्कार करशील—

**वसंतसेना** : ते कां ?

**चारुदत्त** : मला तर द्यूताचा फार नाद आहे.

**वसंतसेना** : खरं ?

**मैत्रेय** : तर काय हो. ( वसंतसेना हंसते. )

**चारुदत्त** : खोटं वाटतं तुला ? विचार पाहिजे तर याला.

**मैत्रेय** : मला ! छेः छेः, कांहीं विचारूं नका. ह्याच्यामुळें मलादेखील द्यूताचं व्यसन लागलं आहे बघा !

**चारुदत्त** : काल तुला पोंचवून मी परत आलों—( मैत्रेयाला ) तूंच सांग रे मैत्रेया !

**मैत्रेय** : नाहीं, नाहीं, तूंच सांगितलेलं बरं !

**चारुदत्त** : ( चालतां चालतां ) हं तर काय बरं म्हणत होतों.

**वसंतसेना** : मला पोचवून आपण परत गेलांत—

**चारुदत्त** : बरोबर अन् इतक्यांत माझे कांहीं द्यूतकार मित्र घरीं आले. द्यूत खेळायला सुरवात झाली, अन् मला कांहीं भान राहिलं नाहीं.

**मैत्रेय** : अगदीं भान राहिलं नाहीं हो !

**चारुदत्त** : अन् तूं माझ्याजवळ विश्वासानें ठेवलेले सारे अलंकार मी द्यूतांत गमावून बसलों.

**वसंतसेना** : हात्तिच्या, एवढंच ? गेले तर गेले दागिने ! त्याच काय एवढं मोठं ?

**चारुदत्त** छे : छे :, मी आयुष्यांत कोणाचंही ऋण ठेवलेलं नाहीं. तेव्हां त्या दागिन्याचा मोबदला म्हणून मी ही रत्नमाला तुला द्यायला आणली आहे. ( रत्नमाला देतो ) घे.

**वसंतसेना** : अगबाई, ही तर पृथ्वीमोलाची रत्नमाला दिसते आहे ! किती शोभून दिसते माझ्या गळ्यांत, नाहीं ? थांबा, मी आईकडून हिचं मोल करून आणत्ये ( आंत जाते. )

**मैत्रेय** : तूं म्हणत होतास ना कीं ती रत्नमाला घेणार नाहीं म्हणून ! आतां ? बोलूनचालून ती गणिका ! रत्नमाला पाहिली रे पाहिली ! लागलीच तिनं एखाद्या घारीसारखी झडप घातली. अरे बाबा, अजून तरी ताळ्यावर ये, अन्

या बाईचा नाद सोड. गणिका म्हणजे जोड्यांतल्या खड्यांसारख्या आहेत. लौकर निघत नाहींत अन् खुपल्याशिवाय राहात नाहींत !

**वसंतसेना** : ( ओरडत येते ) आर्या, आर्या, घात झाला--पुरता घात झाला. मी ती किनई रत्नमाला आईला दाखवून परत आणत होत्यें, तों एकदम वरून एक घार आली अन् माझ्या हातावर झडप घालून ती रत्नमाला घेऊन गेली ! ( रडूं लागते )

**चारुदत्त** : त्यांत काय एवढं—जाऊं दे गेली तर !

**मैत्रेय** : ( संतापून ) जाऊं काय दे ? साफ खोटं आहे हें ! अरे मित्रा, कसली घार अन् गिधाड घेऊन बसला आहेस—ही निव्वळ डाकूगिरी आहे !

**वसंतसेना** : ( रडत ) नाहीं हो आर्या. अगदीं खरं आहे हे ! म्हणून आई म्हणाली कीं त्या रत्नमालेबद्दल हे अलंकार त्यांना देऊन टाक. मदनिके—

**मैत्रेय** : ( रागावून ) कांहीं नको ते अलंकार—चल रे !

**चारुदत्त** : पण मित्रा, जरा थांब !

**मैत्रेय** : थांब काय ? चोरांचा बाजार सगळा !

**वसंतसेना** : पण महाराज, एकदां पहाल तर खरं !

**मैत्रेय** : पाहिलंय् पाहिलंय् खूप ! घेऊन जा इथून.

ताट झिडकारतो. ताट खालीं पडतें.

**मैत्रेय** : ( पंचा ओळखून ) आ : म्हणजे ? हा तर माझा पंचा !

**चारुदत्त** : पण हे दागिनें इथे कसे आले ?

**वसंतसेना** : कसे आले ? मी काल तुमच्यापासून द्यूतांत नाहीं का जिंकले हरलात ना काल ? ( वेडावत ) म्हणे मला द्यूताचं फार व्यसन आहे. कशी फजिती केली एका माणसाची ! ( चारुदत्त आणि मैत्रेय हंसतात ) ही घ्या तुमची रत्नमाला अन् हा घ्या तुमचा पंचा !

**चारुदत्त :** ( रत्नमाला तिच्या गळ्यांत घालीत ) ही रत्नमाला इथंच शोभून दिसते.

**वसंतसेना :** ( चारुदत्ताच्या गळ्यांत घालत ) नाहीं, ती याच गळ्यांत छान दिसते.

**चारुदत्त :** मी ती तुझ्याच गळ्यांत घालणार ! तूं माझं ऐकलंच पाहिजेस !

**मैत्रेय :** ए, अरे काय चालवलंय् काय तुम्हीं माझ्या म्हाताऱ्याच्या देखत ! जरा थांबा. हें पहा, तुला तुझी रत्नमाला मिळाली, हिला हिचे दागिने मिळाले अन् मला माझा पंचा मिळाला. आतां मी जरा हिचा वाडा पाहून येतो—तोंपर्यंत तुमचं तरुण मंडळीचं तें काय असतं तें चालूं द्या खुशाल !

तो जातो.

**चारुदत्त :** वसंतसेने—

**वसंतसेना :** माझ्या प्रेमाची तुलना या रत्नमालेनं करणं तुम्हांला शोभलं कां ?

**चारुदत्तः** अन् माझ्या प्रेमाची परीक्षा दागिन्यांनीं करणं तरी तुला शोभलं कां ?

**वसंतसेना :** जाऊं द्या, आतां कशाला दागिन्याचं नांव काढतां ? आर्या, आज तुम्ही प्रथम माझ्या मंदिरांत आलांत ! कसं मी तुमचं स्वागत करूं ? काय मी तुम्हांला देऊं ? तुम्हांला नाचून दाखवूं कां गाऊन दाखवूं ?

**चारुदत्त :** कामदेवाच्या मंदिरांत तुझं तें नृत्य पाहिल्यापासून मला तुझ्या नृत्यानं मोहिनी घातली आहे ! तुझ्या पैंजणांचा झंकार अजून माझ्या हृदयांत घुमतो आहे ! नाच—नाच वसंतसेने, असं नृत्य नाच कीं माझ्या शरीरांतील कणन् कण त्या तालावर नाचूं लागला पाहिजे.

**वसंतसेना :** आर्या, नृत्य म्हणजे माझी भाषा—नृत्य म्हणजे माझं संगीत—नृत्य म्हणजे माझं जीवन ! आजपर्यंत भगवान् कामदेवावांचून मी कुणापुढं नाचलें नाहीं ! तुम्ही माझे कामदेव आहांत—तुम्ही माझ्या प्रीतीचे

परमेश्वर आहांत–तुमच्या प्रेमासाठीं आतुर होऊन माझे प्राण थयथय नाचताहेत या शरीरांत; मी तुमच्यापुढं कशी नाचणार नाहीं? मदनिके, परभृतिके, पल्लविके, कुठं गेल्या या साऱ्याजणी–( धांवत जाते. ) मदनिके, परभृतिके, पल्लविके, अग वाद्यकारांना हाका मारा, मी आर्यापुढं नाचणार आहे.

**रंभा** : म्हणजे, काय मांडलयंस काय तूं हें? आर्य चारुदत्तापुढें कां तूं नाचणार आहेस?

**वसंतसेना** : हो, हो, त्यांच्यापुढें! म्हटलं आर्य चारुदत्ताच्यापुढें!

**रंभा** : वेड तर लागलं नाहीं तुला? अग सौंदर्यानं, अन् सद्‌गुणानं ते किती जरी श्रेष्ठ असले तरी आज त्यांच्याजवळ एक कपर्दिकही नाहीं–दरिद्री माणसा-पुढं नायकिणीनं नाचून कसं चालेल! तूं नुसतं सांगायचा अवकाश, कीं राजे अन् महाराजे लोळण घेतील तुझ्यापुढं!

**वसंतसेना** : मला करायचेत काय ते राजे महाराजे! माझ्या प्रेमाचे राजे, माझ्या सौभाग्याचे सम्राट् आज माझ्या मंदिरात आले आहेत. मी त्यांच्यापुढें नाचलें तर ते माझ्या मस्तकावर आनंदाश्रूंचा अभिषेक उधळतील! माझ्या ललाटावर प्रेमाचा मुकुट चढवतील अन् हृदयाच्या सिंहासनावर बसवून मला आपल्या संसाराची सम्राज्ञी करतील, समजलीस! ( धांवत जाते. )

**रंभा** : आतां मात्र हिचं डोकं फिरलंय्! नायकिणीच्या मुली प्रेमपाशांत पडूं लागल्या म्हणजे निकाल लागला आमच्या धंद्याचा!

**शकार** : ( बाहेरून ओरडत येतो. ) कुठं आहे ती वशंतशेना—

**रंभा** : अगबाई, राजश्यालक शकार आले वाटतं—आतां कसं करायचं?

**शकार** : ( आंत येऊन ) कुठं आहे ती वशंतशेना? त्या दिवशीं देवळांत माझं न ऐकतां पळून गेली अन् आज माझ्या दागिन्यांना लाथ मारते! माझ्या नोकरांना कुत्र्यासारखं हाकून देते! कशा सहन करूं मी हा अपमान?

**रंभा** : शांत व्हा महाराज, असं रागावूं नका.

**शाकार** : तूं कशाला येतेस माझ्यासमोर. मी वसंतसेनेला भेटायला आलों आहे, तुला नाहीं ! काय नशीब आहे, मी वसंतसेनेचा चेहेरा पाहायला आलों तो मला या म्हातारीचाच चेहेरा पाहाण्याची पाळी आली आहे !

**रंभा** : ( अदबीनें ) तिला—

**शाकार** : ( वेडावून ) बरं नाहीं.

**रंभा** : तिचं—

**शाकार** : ( वेडावून ) डोकं दुखतंय्. मला ठाऊक आहेत तुमच्या नायकिणींच्या थापा ! एक यजमान आंत असला म्हणजे बाहेरच्याला सांगायचं, तिला आतां बरं नाहीं ! मी नक्की सांगतों; तो भिकारडा चारुदत्त आंत बसला आहे—( आंतून वाद्यांचे सूर ऐकूं येतात. ) तीं पहा—तीं वाद्यें वाजूं लागलीं. तीं घुंगरं छुम छुम करूं लागली. माझ्या अंगाची आग आग झाली आहे अन् ती नाचते आहे त्या भिकारड्यापुढें.

**रंभा** : मी पाया पडतें महाराज, तुम्ही आतां जा—उद्यां या ! खरं सांगूं तुम्हांला ! आमच्या नायकिणीच्या मुली हल्लीं भारी बिघडल्यात ! त्यांना धंदा करायला नको. आपलं एकाच माणसाच्या नादीं लागतात अन् शेवटीं लग्न करतात !

**शाकार** : मला ठाऊक आहे—वसंतसेना तशी फार चांगली आहे. पण त्या भिकारड्या चारुदत्तानंच तिला बिघडवून टाकलं आहे.

**रंभा** : चारुदत्ताच्या रुपावर अन् गुणावर भुलली आहे ती !

**शाकार** : दरिद्री माणसाला कुठं रुप अन् गुण असतात ! ज्याच्याजवळ पैसे, दागिनें, सोनं असतं तोच खरा गुणवान् अन् सुंदर असतो. ते कांहीं नाहीं—त्या चारुदत्ताला ठार केल्यावांचून मला ती वसंतसेना मिळायची नाहीं !

**रंभा** : नका महाराज, मी माझ्या मुलीचं मन वळवीन, पण चारुदत्ताच्या जिवाला अपाय होतां कामा नये !

**शकार :** त्या भिकारड्या चारुदत्ताची कड घेतेश अन् माझ्याशमोर! तो काय जांवई आहे काय तुझा? त्याचा प्राण तर मी घेईनच घेईन पण फणस कापून त्याचे जशे गरे काढतात, तशा त्याला कापून त्याची आंतडी बाहेर काढीन. विटा, माझं खड्ग आण!

**विट :** हो महाराज — पण आपल्यासारख्या वीर श्रेष्ठांनीं अन् नायकिणीच्या घरांत खड्ग उपसणें म्हणजे जरा—

**शकार :** अश्शं — हें नायकिणीचं घर आहे नाहीं कां—अन् मी वीरश्रेष्ठ आहे नाहीं कां—मग नकोच तें खडग! पण लक्षांत ठेव, पुनः माझा अपमान होतां कामा नये—उद्यां माझा अपमान होतां कामा नये—

**रंभा :** तुम्हीं कांहीं काळजी करूं नका.

**शकार :** चलारे. ( जातात. )

## : : १९

चारुदत्तापुढें वसंतसेना नाचत आहे. ती आपल्या नृत्यकौशल्याची परिसीमा करते.

**वसंतसेना :** (नाचतां नाचतां) वसंतऋतूंतील सोनेरी उन्हाप्रमाणें तूं माझ्यासमोर हांसत आलास! वारा हांसत होता! चंडोल गात होते! लाटा नाचत होत्या! तुला बघून माझ्या प्रीतीचं कमळ पहिल्यानं उमललं बरं राजसा!

स्वप्नांच्या गुलाबी बगीचांत, रोज रात्रीं तूं मला भेटतोस! पण मी डोळे उघडतांच तूं दिसेनासा होतोस! तुला कुठं शोधूं माझ्या राया? पांखरांना विचारते, तीं म्हणतात 'नाहीं!' हरणांना विचारते, ती म्हणतात 'नाहीं'! तुझ्या विरहाचा वणवा हृदयांत एकसारखा पेटला आहे. साऱ्या अंगाची आग आग होतें आहे रे राजसा!

जिवाच्या जिवा, श्रावण महिन्यांतल्या पावसाप्रमाणें तुझ्या प्रीतीची बरसात

माझ्या हृदयावर उधळ. माझ्या देहावरचे रोमन् रोम फुलूं देत ! माझा जीव आनंदानं धुंद होऊं दे. माझे पांचहि प्राण तुझ्या स्वागतासाठीं वेडे होऊन असेच नाचूं देत !

माझ्या सौंदर्याचा फुलबहार तुझ्या पायांवर वाहून तुझी पूजा करणार आहे बरं माझ्या देवा !

चारुदत्त धुंद मनःस्थितीत परत जात आहे. मैत्रेय मागून येतो.

**मैत्रेय** : मित्रा, अरे विसरलास वाटतं मला इतक्यांत !

## : : २०

वसंतसेना आपल्या शयनमंदिरांत गात आहे.

मी तुझी दासी, कुठें रे प्रभु जासी ?
हांक ऐकुनी प्रीतीची धांव कां न घेसी ?
तूं प्राणज्योती—मी तुझी काया,
तूं देहकांती—मी तुझी छाया,
प्रीतीचें सरोवर तूं—मी त्यांत राजहंसी,
रसिक भ्रमर तूं—मी नवकलिका,
कल्पतरू तूं—मी सुमलतिका,
दर्शनासी आतुर झाला—जीव हा उदासी !

## : : २१

चारुदत्त व मैत्रेय उद्यानांतून चाललेले आहेत.

**चारुदत्त** : मित्रा, आज माझ्या सुखाला पारावर नाहीं ! (त्याचे खांदे हालवतो)

**मैत्रेय** : मला कां म्हाताऱ्याला त्रास देतो आहेस ! तूं मजा करतोस अन् मला मिठ्या मारतोस !

**चारुदत्त** : अरे, आज ती घरीं येणार आहे.

**मैत्रेय** : म्हणजे गोष्टी या थराला येऊन पोंचल्या कां ! छान, पण मित्रा, उद्यां सकाळीं लवकर उठून आर्यक राजाला सोडवायला जायचंय्--तूं रात्रीं जाग्रणं करशील अन् सकाळीं—

**चारुदत्त** : प्रेमामुळें चारुदत्त आपलं कर्तव्य केव्हांहि विसरणार नाहीं ! (आकाशांत एकदम ढग गडगडतात) बघ ही साक्ष—

## : : २२

ढगांचा गडगडाट ऐकूं येतो. वसंतसेना एकदम उठते.

**वसंतसेना** : (गाते) मेघ पहा गगनिं करिति गडगडाट, व्याकुळ मन होई ! मदनिके, माधविके, माझी ओढणी आण.

**मदनिका** : बाहेर जायचंय् !

**वसंतसेना** : तुला काय करायचंय्—आण लवकर !

**माधविका** : पण आभाळ भरून आलंय्.

**वसंतसेना** : एकदां सांगितलं ना तुला ! (मदनिका वसंतसेनेची ओढणी आणते. वसंतसेना रंभेच्या खोलींतून जाते.)

**रंभा** : कुठं चाललीस या भलत्यावेळीं !

**वसंतसेना** : चारुदत्ताकडे—

**रंभा** : अग ए थांब—वेड लागलंय् काय तुला !

**वसंतसेना** : मी रात्रीं येणार नाहीं—

रंभा मुग्ध होते.

: : २३

मेघांचा गडगडाट, विजेचा लखलखाट-सोसाट्याचा वारा चालू आहे

**चारुदत्त** : हे मेघ म्हणजे आभाळांत आणि प्रेमी माणसांच्या मार्गांत आलेले अडथळेच होत !

**मैत्रेय** : अरे मित्रा, तो पाहिलास कां काळाकुट्ट मेघ ! त्याच्यांत चमकणारी ती वीज ! मला तर वाटतं स्वर्गातला एकादा काळा रेडा रागानं आपले दांत विचकतो आहे !

**चारुदत्त** : छे: छे:, मित्रा, तसं नाहीं ! विद्युल्लतेचा पिवळा भरजरी पीतांबर नेसून मेघश्याम कृष्णच आकाशांतून चालले आहेत असं मला वाटतं ! ( पाऊस जोरांत पडत आहे-वसंतसेना भिजून चिंब झाली आहे. )

**वसंतसेना** : ( धांवत ) आर्या—चारुदत्ता.

**चारुदत्त** : खास हा तिचाच आवाज आहे. मित्रा, तूं पुढं जा, मी येतोंच तिला घेऊन. ( मार्गे वळून जातो )

**मैत्रेय** : आतां मित्र मेला तरी त्याची काय पर्वा आहे !

एका बाजूनें चारुदत्त " वसंतसेने—वसंतसेने " असें ओरडत येतो. दुसऱ्या बाजूनें वसंतसेना " आर्या—चारुदत्ता " असें ओरडत येते—दोघांची गांठ पडते.

**चारुदत्त** : आर्ये—

**वसंतसेना** : आर्या—

वीज चमकते

**वसंतसेना** : ही पावसाळ्यांतली रात्र मला एकाद्या सवतीसारखी भासते आहे. आपणाला आज एकांत मिळणार म्हणून रागानें कशी ती ओरडते आहे,

दात खाते आहे अन् रडते आहे ! मण लक्षांत ठेव–प्रियकराला भेटायला निघालेली स्त्री प्रत्यक्ष प्रलय काळाचीही पर्वा करणार नाहीं !

**चारुदत्त :** या आभाळाला तर वेड लागलंयू ! विजेनें तें जळतं आहे—पावसानं गळतं आहे—वाऱ्यानं बरळतं आहे अन् मेघानं ओरडतं आहे !

**वसंतसेना :** तो मेघ तर मेला असा वाईट आहे—मोठ्यामोठ्यानं ओरडून मला भिववतो आहे. पण तो तर पुरुष आहे ! मला त्या विजेला असं विचारायचंय—तूं कां बाई दात विचकते आहेस ? स्त्री असून बायकांचं दुःख तूं कसं जाणत नाहींस !

**चारुदत्त :** अग वीज तुझी मैत्रीण आहे. मधून मधून प्रकाश पाडून ती तुला आपल्या प्रियकराच्या घराची वाट दाखवत आहे.

**वसंतसेना :** अग बाई—ते पाहिलंत का—त्या विजेनं त्या मेघाला आपण होऊन आलिंगन दिलं आहे !

मेघ कडाडतो. वसंतसेना चारुदत्ताच्या गळ्याला मिठी मारते.

**चारुदत्त :** शाबास मेघा, तूं गर्जना करून पुरुषजातीचं नांव राखलंस ! ( मेघ गडगडतो ) हास, हास—तूं मला माझ्या प्रियेच्या स्पर्शाचं सुख दिलंस—तुझ्यावर मी प्रसन्न आहे. या पावसाळ्याला दुर्दिन म्हणणारे कोण अरसिक असतील ते असोत ! प्रियेच्या दुर्लभ आलिंगनाचा लाभ जर मला या दुर्दिनामुळं मिळणार असेल, तर संबंध वर्षभर असेच दुर्दिन राहोत, अशी माझी परमेश्वराला प्रार्थना आहे.

मेघ गडगडतात. विजा चमकतात. चारुदत्त मोठमोठ्यानें हसतो. वसंतसेना लाजते.

**म ध्य न्त र**

: : २४

रात्र संपलेली आहे. सकाळ झालेली आहे. आदल्या रात्रींच्या वादळानंतरची ही सकाळ आहे. रेभिल गात आहे. वसंतसेना झोंपलेली आहे. चारुदत्त हलकेच पाय न वाजवता उठतो व कमरेला खड्ग बांधून मैत्रेयाबरोबर बाहेर जातो.

उगवे पहा प्रभात
सुवर्णगंगा नभीं वहात !
दाही दिशा या उभ्या घेउनी,
कुंकुम कलश करांत
लखलखतो हा अरुणाचा रथ
गगनाच्या दारांत !
सरली रजनी—ऊठ कमलिनी,
गुंजति भ्रमर बनांत,
भाट प्रीतीचे गात हिंडती
जयजयकार नभांत !

यानंतर कांहीं वेळानें कोवळीं उन्हें वसंतसेनेच्या अंगावर पडतात. ती जागी होते. शेजारीं तिला चारुदत्त दिसत नाहीं, तशी ती सावरून बसते. तोंच रदनिका येते.

**रदनिका :** हीं आपलीं वस्त्रं आणलीं आहेत बाईसाहेब !

**वसंतसेना :** रदनिके, इतक्या लवकर ग कसं उजाडलं ! अन् माझे द्यूतकार कुठं आहेत ?

**रदनिका :** ते सकाळींच उठून मैत्रैयाबरोबर कांहीं महत्त्वाच्या कामासाठीं बाहेर गेले आहेत. तुम्हांला त्यांनीं पुष्पकरंडक उद्यानांत बोलावलं आहे.

**वसंतसेना :** खरं ग खरं ! कालच त्यांनीं मला सांगून ठेवलं होतं ! आत्तांचें आत्तां मला तिकडे गेलंच पाहिजे !

**रदनिका :** बाईसाहेब ?

**वसंतसेना :** काय ग ?

**रदनिका :** ( धांवून ) कांहीं नाहीं !

**वसंतसेना :** असं काय—सांग ना ?

**रदनिका :** कांहीं नाहीं—रात्रीं जाग्रण झालेलं दिसतंय् !

**वसंतसेना :** ( लाजून ) चल, चावट कुठली !

रोहसेन रडत असल्याचा आवाज येतो. रदनिका जाते.

**रोहसेन :** रदनिके—रदनिके—

**रदनिका :** काय झालं माझ्या बाळाला !

**रोहसेन :** (रडत) मला नको हा मातीचा गाडा ! मला सोन्याचा गाडा पाहिजे !

**रदनिका :** बाळ, आपण आतां गरीब आहोंत-आपल्या घरांत सोन्याचा गाडा कुठून येणार ?

**रोहसेन :** मग माझा सोन्याचा गाडा कां घेऊन गेले राजाचे शिपाई ?

**मदनिका :** तो राजा किनई वाईट आहे फार !

**रोहसेन :** *मला भेटला तो तर मी मारीन त्याला. अन् मी राजा होईन !*

**रदनिका :** कसं गुणाचं बाळ आहे माझं ! जा खेळ हा मातीचा गाडा घेऊन !

**रोहसेन :** नाहीं, नाहीं. मला सोन्याचा गाडा पाहिजे. ( रडूं लागतो )

**रदनिका** : बरं बरं, उगा उगा बाळ. ( त्याला वर आणते )

**वसंतसेना** : अग बाई, हाच कां आर्यांचा मुलगा ? किती सुंदर दिसतो आहे ! बाळ, माझ्याजवळ येतोस ? काय पाहिजे तुला ?

**रदनिका** : सोन्याच्या गाड्याचा हट्ट धरून बसलाय् तो !

**रोहसेन** : रदनिके, कोण ग ही ?

**वसंतसेना** : मी तुझ्या पित्याची दासी आहे बाळ !

**रोहसेन** : चल, इतकी चांगली बाई कुठं दासी असते कां ?

**रदनिका** : बाळ, ही तुझी आई आहे !

**रोहसेन** : आई ? पण माझी आई तर देवाच्या घरीं गेली आहे !

**वसंतसेना** : ये रे माझ्या लाडक्या ! रदनिके, तूं गाडी जोडून दरवाजाशीं आणायला सांग. ( रदनिका जाते. ) थांब हं, आपण हा गाडा किनई सोन्याचा करूं !

**रोहसेन** : सोन्याचा ?

**वसंतसेना** : हो हो सोन्याचा !

**रोहसेन** : आत्तां ?

**वसंतसेना** : हो आत्तां ! बघ तर खरं—हं, डोळे मीट पाहूं !

## : : २५

**रदनिका** : वर्धमानका, ए वर्धमानका.

**वर्धमानका** : ओ—

**रदनिका** : गाडी जोडून तयार कर बघूं लवकर !

: : २६

**रोहसेन** : उघडूं मी आतां डोळे !

**वसंतसेना** : थांब हं. इतक्यांत नाहीं उघडायचे. हा बघ–हा बघ—हा झाला–हं, उघड आतां डोळे हं—झाला किनई सोन्याचा गाडा !

**रोहसेन** : ( आनंदानें ) सोन्याचा गाडा–आमचा सोन्याचा गाडा–जाऊं मी आतां खेळायला.

**वसंतसेना** : जा बरं !

**रोहसेन** : बघ, तूं हे दागिने मागशील फिरून—

**वसंतसेना** : नाहीं, मी ते तुलाच देऊन टाकलेत बरं—

**रोहसेन** : खरं !

**वसंतसेना** : अगदीं, अगदीं खरं.

**रोहसेन** : ( नाचत ) आमचा सोन्याचा गाडा. आमचा सोन्याचा गाडा.

नाचे छुम छुम घोडा,
सोन्याचा माझा गाडा !
राजा चोरी कां करतो ?
अगदींच बेटा वेडा !
वेडा-वेडा-वेडा-वेडा ! राजा वेडा !
सोन्याचा माझा गाडा !

**वसंतसेना** : छोटा माझा शूर शिपाई,

राजाशीं ग करिल लढाई !

**रोहसेन** : सांगुं तुला ? जिंकीन मी—

तो राजाचा वाडा !

लाविन मी, त्यावरतीं

हा गरीबाचा झेंडा !

नाचे छुम छुम घोडा—सोन्याचा माझा गाडा !

**रोहसेन** : किती किती चांगली आहेस तूं ! माझा एक मुका घे पाहूं.

**वसंतसेना** : अगदीं—अगदीं त्यांच्यासारखा आहे सुंदर ! बोल, आतां आहे कीं नाहीं मी तुझी आई !

**रोहसेन** : आतां तात आले म्हणजे मी त्यांना सांगणार आहे—

**वसंतसेना** : काय सांगणार आहेस तूं त्यांना ?

**रोहसेन** : कीं मला हीच आई पाहिजे म्हणून !

दवंडीचा आवाज येतो.

: : २७

**राजदूत** : पौरजनहो—ऐका हो ऐका. पालक राजाच्या बंदिगृहांतून, गोपाल पुत्र आर्यक, आज पहांटे पळून गेलेला आहे. त्याला जो कोणी आपल्या घरांत आश्रय देईल किंवा कोणत्याही प्रकारें सहाय्य करील, त्याचा तत्काल शिरच्छेद केला जाईल ! त्याला पकडून नगररक्षकाच्या स्वाधीन करणारास दहा हजार सुवर्ण दिले जातील हो !

: : २८

**रदनिका** : गाडी तयार आहे बाईसाहेब—

**वसंतसेना** : चला.

**रोहसेन** : आई, लवकर ये बरं कां.!

: : २९

मैत्रेयाच्या घरासमोर गाडी आहे. गाडी सर्व बाजूंनीं झांकलेली असून पुढें वर्धमानक बसलेला आहे. इतक्यांत शर्विलक आर्यकाला घेऊन लपत लपत धांवत येतो.

**शर्विलक** : हें चारुदत्तांचें घर, अन् ही त्यांचीच गाडी. आपण आंत बसावं.

आर्यक गाडींत लपतो. शर्विलक पसार होतो. वर्धमानकाला वाटतं कीं आंत वसंतसेना येऊन बसली. तो कानोसा घेतल्यासारखा करतो.

**वर्धमानक** : काय, आलांत ना बाईसाहेब ? ( इतक्यांत मागून शकाराची गाडी येते. )

**शकाराचा गाडीवान** : गाडी हाक. गाडी हाक. (पुढील गाडीला धोंडा मारतो ) वाटेंत काय उभी केली आहेस ?

**वर्धमानक** : काय रे ए, कांहीं दम आहे कीं नाहीं ?

**गाडीवान** : संभाळून बोल, ही राजाच्या मेहुण्याची गाडी आहे !

**वर्धमानक** : येतील, आमचेही दिवस येतील !

गाडी पुढें सरकते. शकाराची गाडी दरवाज्यापुढें येते व पुढची गाडी हळूं चालते आहे म्हणून एक क्षणभर चारुदत्ताच्या दारापुढें थांबते. इतक्यांत आंतून वसंतसेना येते व त्या गाडींत बसते. दोन्ही गाड्या चालू लागतात. मागून राजाचे दूत येतात.

**१ राजदूत** : अरे, त्या गाडींत तर बसला नाहीं तो !

**२ राजदूत** : छे रे, त्या गाडींत वसंतसेना बसलेली मी पाहिली.

**१ राजदूत** : चारुदत्ताच्या घरांत वसंतसेना !

**२ राजदूत** : मजा आहे अन् काय त्या चारुदत्ताची ! नाहीं तर आपण ! इतक्यांत मागून शर्विलक ओरडतो.

**शर्विलक** : अरे, इकडे यारे–आर्यक या रस्त्यानें पळाला आहे. मी पाहिला. चला–पळा पळा–( राजदूत शर्विलकानें दाखविलेल्या रस्त्यानें जातात. )

: : ३०

चारुदत्त आणि मैत्रेय वसंतसेनेची पुष्पक उद्यानासमोर वाट पहात आहेत. मैत्रेय आणि चारुदत्त उद्यानासमोर येतात

**चारुदत्त** : अरे, महाराज सुटले अन् तूं खिन्न कां !

**मैत्रेय** : नाहीं. सुटले ते एकापरीनं बरं झालं म्हणा, पण आपल्या पहांटे उठण्याचा काय उपयोग झाला ! या वाकड्या सोट्याचा इंगा दाखवायचा राहिला शत्रूंना. असो, चला आतां—

**चारुदत्त** : थांब, इथंच थोडा वेळ थांबू या.

**मैत्रेय** : कां रे बाबा, आतां कशाला !

**चारुदत्त** : तुला माहीत नाहीं ! वसंतसेना इथं येणार आहे.

**मैत्रेय** : असं का ! मग बसा तुम्ही—मी आहे इथंच—आडोशाला संध्या करीत !

चारुदत्त स्वतःशींच विचार करीत हिंडतो.

ती मोहक बाला
हांसत आली—घेऊन फुललेली
प्रीतीची माला !
नील नभीं शोभतसे—शुक्राची तारा,
अवतरली अवनितलीं—अमृताची धारा !
स्वर्गीची चपला !

स्फटिकांच्या लखलखती—ओंठांतुनी ओळी,
अरुणाची नाचतसे—गालावर लाली !
भासे वनमाला !

नेत्र तिचे बघुनि निळे,
झुरतीं मनीं मृगबाळें,
हंसाचा गर्व पळे—बघुनि तिची लीला !

इतक्यांत बैलगाडीचा आवाज येतो.

चारुदत्त वसंतसेनेला गाडींतून उतरवण्याकरितां पुढें येतो.

**चारुदत्त** : ये, वसंतसेने, ये ! लाजूं नकोस. इथं या मैत्रेयावांचून कोणी नाहीं.

आर्यक आंतून डोकावतो.

**आर्यक** : कोण—आर्या ?

**चारुदत्त** : कोण महाराज ? तुम्ही या गाडींत कसे ?

**आर्यक** : शर्विलकाच्या साहाय्यानं मी बंदिशाळेंतून सुटलों. माझ्यामागें

राजदूत लागले. मी आपल्या घरांत लपण्यासाठीं धांवत आलों पण शेवटच्या क्षणीं विचार बदलून आपल्या गाडींत बसलों आणि इथं आलों !

**चारुदत्त** : माझ्या घरांत शिरला नाहींत तें फार बरं केलंत महाराज ! कारण माझ्या घरावर राजदूतांची पाळत आहे. थांबा, मी आपल्या हातांतल्या बेड्या काढतो.

**आर्यक** : हातांतली बेडी काढलीत पण हृदयाला बेडी घातलीत. आर्या, तुमचे उपकार कसे फेडूं मी ?

**चारुदत्त** : तुमच्या दुष्ट चुलत्याला अवंतीच्या सिंहासनावरून खाली ओढून तुम्हांला तेथें बसलेलं पाहीन तेव्हांच मी कृतकृत्य होईन ! चला. इथं कोणीतरी पाहील तुम्हांला. आपण गांवाबाहेर जाऊं ! मैत्रेया, घरीं जाऊन तिला सांग–म्हणावं मी फार कामांत आहे. इकडे येऊं नकोस.

मैत्रेय एका बाजूनें जातो. आर्यक व चारुदत्त गाडींत बसतात.

## : : ३१

पुष्पकरंडक उद्यानाची दुसरी बाजू. एक भिक्षु आपली ओली छाटी एका झुडुपावर वाळत घालत आहे. तोंडानें तो 'ओम् नमो बुद्धाय' असें म्हणत आहे. शकार, चेट आणि विट दबा धरीत त्या दिशेनें येतात.

**शकार** : शापडला–हाच तो आर्यक अशला पाहिजे ! शाऱ्या डोक्याची हजामत करून कशं शोंग घेतलंय् त्यानं शाधूचं !

**विट** : छे: महाराज, हा कुणीतरी बुद्ध भिक्षु दिसतोय् !

**शकार** : तूं गप्प बस. ( भिक्षूच्या अंगावर धांवून जातो ) ए ओम् नमो बुद्धाय, काय करतो आहेश बागेंत ? उभा राहा तिथं ! विटा, उपश माझें खड्ग

आणि दारू पितांना तांबड्या मुळयाचा बुडखा जशा कचकन् तोडतात, तशं ह्याचं हें बिन केशाचं टाळकं शपकन् कापून टाक.

**विट :** महाराज, हें काम तुम्हीच करा !

**शकार :** या माकडाला मारायला मी खड्ग हातांत धरूं ? छट्, मी हें खड्ग एकदाच हातांत धरीन—केव्हां, चारुदत्ताला मारायच्यावेळीं ! विटा, बघतोश काय ? हें घे खड्ग !

**भिक्षु :** उपासका, मी पाया पडतो. मला मारूं नका !

**शकार :** विटा, अरे हा घाबरलाय-अन् माझ्या पाया कीं रे पडायला लागलाय् ! हा नाहीं दिशत तो आर्यक !

**विट :** तेंच तर मी तुम्हाला सांगत होतों महाराज !

**शकार :** पण यांनीं मला फशवलं कां रे विनाकारण ? हा लुच्चा आहे बरं कां. याला ठारच मारलं पाहिजे !

**भिक्षु :** ( घाबरून ) ओम् नमो बुद्धाय !

**शकार :** ए, शंश्कृतमधें मला शिव्या देऊं नकोस. नमस्कार कर मला आधीं.

**भिक्षु :** ( त्वेषानें नमस्कार करीत ) दुर्जनं प्रथम् वन्दे !

**शकार :** कशं शंश्कृतमध्यें पाया पडायला लावलं मी ह्याला !

**विट :** झालं ना आतां महाराज, मग द्या यांना सोडून.

**शकार :** थांब, मला विचार करूं दे. दूर शर. दूर शर. मला विचार करायला जागा पाहिजे पुष्कळ ! ( स्वतःशींच ) कायरे बेट्या मना, जागा आहेश कां झोपला आहेश ! तें बघ, या गोशावड्याला शोडून देऊं कां मारून टाकूं ? काय म्हणालाश ? अशं अशं ! ठरलं ! ए ओम् नमो बुद्धाय, इकडे ये ! वाक खालीं. टेक हात जमिनीवर ! ए, आतां मला कुत्र्याशारखा भुंकून दाखव बघूं ! भूः भूः भूः !

**भिक्षु :** ( चिडून ) मनुष्यराक्षसा, तूं रौरवांत जाशील.

**शकार** : म्हणजे, विटा काय म्हणाला रे हा ?

**विट** : त्यानं आशीर्वाद दिला, तुमचं आवडतं माणूस तुम्हाला लौकरच भेटेल म्हणून!

**शकार** : अशं ? माझं आवडतं माणूश म्हणजे वशंतशेना,मला लवकर भेटेल! जा जा, पळ, तुला शोडून दिलं! (हंसतो) किती शुंदर आहे बाग ही! फुलांची घाण किती छान शुटली आहे. चिडलेल्या माकडाशारखा शूर्य किती तांबडालाल दिसतो आहे. अरे, या कारंजाला भोकं पडून पाणी बघ कशं शांडतं आहे! झाडावरची पाखरं बघून माझ्या तोंडाला पाणी शुटलं आहे कशं! अहाहा-आतां मला गाणं म्हणावशं वाटूं लागलं आहे! मित्रा—

**विट** : महाराज, नको! पाया पडतो तुमच्या—

**शकार** : कां रे मित्रा !

**विट** : गाणं म्हणायचं म्हणजे गळा लागतो महाराज !

**शकार** : *मग हा गळा नाहीं तर काय नळा आहे होय रे? तें कांहीं नाहीं! मी गाणं म्हणणार! रोज शकाळीं दोन कोकिळा तुपांत तळून खातो तें काय* उगाच ? ऊं ऊं ऊं! काय म्हणूं-हो रे हो! ते वशंतशेनेवर मी रचलेलं गाणंच म्हणतो.

वशंतशेना राणी—माझी
शौंदर्याची गोणी !
कामाची ती कुंची—माझ्या—प्रेमाची ती चंची,
लावण्याची लोटी—माझ्या शृंगाराची पेटी,
नाकाची ती चपटी—झाली—माशे खाऊन कपटी !

हसतो.

वशंतशेनेची आठवण झाली कीं छाती कशी बेडकाशारखी उडायला लागते ! त्या चारुदत्ताला ठार मारल्यावांचून कांहीं मला ती मिळायची नाहीं.

**विट** : तुम्ही अन् चारुदत्ताला ठार मारणार !

**शकार** : तूं थांब—तुला दाखवीन. बाकी खड्गानं त्याला एकदम मारण्यापेक्षां तो तडफडून तडफडून मेला पाहिजे. विटा, मरणापेक्षां त्याला अधिक यातना होतील अशी कांहीं युक्ति आहे का रे ?

**विट** : आहे ! त्याच्या कीर्तिला कलंक लावायचा !

**शकार** : कलंक ?

**विट** : कलंक म्हणजे डाग लावायचा !

**शकार** : अशं अशं, डाग लावायचा होय. आलं लक्षांत--पण कशानें रे हा डाग लावायचा ?

**विट** : अहो, असं काय करतां ? त्याच्या कीर्तीला डाग लावायचा म्हणजे त्याचं नांव साऱ्या जगांत वाईट करून टाकायचं ! तसं झालं तर चारुदत्त एक क्षणभर देखील जिवंत राहाणार नाहीं.

**शकार** : काय म्हणतोश ? कीर्तीला कलंक लागला तर माणशाला मरणापेक्षां देखील जास्त दुःख होतं काय रे ? कमाल आहे. आपल्याला कांहीं अनुभवच नाहीं. अरे, आपली गाडी आलेली दिशतेय. ( पुढें जाऊन गाडीवानास ) आलाश एकदांचा ?

**गाडीवान** : केव्हांचा आलोय् महाराज.

**शकार** : बैल आले ?

**गाडीवान** : आले-महाराज !

**शकार** : चांकं आली ?

**गाडीवान** : आली महाराज ?

**शकार** : गाडी आली ?

**गाडीवान** : आली महाराज !

**शकार** : ( गाडींत डोकावून ) अन् ही कोण आली ? अरे वशंतशेना ! मित्रा विटा, मला भेटायला आपण होऊन वशंतशेना आली. त्या गोशावड्याचं म्हणणं खरं झालं ! तिचं माझ्यावर प्रेम आहे. ए, हें घे तुला बक्षीस. ये ये शुंदरी, हा राजश्यालक आपल्या पुष्पकरंडक उद्यानांत तुझं स्वागत करतो. विटा त्या बाभळीवरचीं शुंदर पिवळीं फुलं तोडून आण. म्हणजे मी तीं हिच्या केशांत घालतों. माझे चिमणे, माझे शाळुंके, माझ्या हृदयावर पाय ठेवून उतर खालीं म्हणजे बागेंतल्या गोड गोड चिंचा अन् बोरं मी तुला खायला देतों.

**वसंतसेना** : दूर हो. ही तुझी गाडी आहे हें मला माहीत असतं तर मी तिच्यांत पाऊल देखील टाकलं नसतं. तुझं तोंड पहाण्याची मला इच्छा नाहीं. मी चारुदत्तांना भेटायला आलें आहे. आर्या चारुदत्ता, कुठं आहांत तुम्हीं, आर्या—

**शकार** : चाललीश कुठं ? थांब, बघूं दे मला तुझा चेहेरा. किती छान दिशतेश ! अन् तुझे दागिने कुठं गेले ? त्या चारुदत्तानें तर चोरले नाहींत—

**वसंतसेना** : भलतंच काय बोलतां ? मी त्यांच्या बाळाला देऊन टाकले आहेत.

**शकार** : अशं ? तरी हरकत नाहीं. मग तुला एक गाडीभर दागिने मी देईन, पण माझ्यावर प्रेम कर ?

**वसंतसेना** : मी सद्गुणांवर प्रेम करते, सोन्यावर नाहीं !

**शकार** : गणिकेला अशं बोलणं शोभत नाहीं ! अग, तूं शृंगाराची अन् शौंदर्याची बाजारपेठ आहेश ! चारुदत्त काय अन् मी काय दोघंही तुला शारखेच !

**वसंतसेना** : चल, हो दूर. कुठं तो हिमालय अन् कुठं तूं मुंग्याचं वारुळ ! कुठं तो सद्गुणांचा सागर अन् कुठं तूं चिखलाचं डबकं ! कुठं तो राजमुकुटांतला हिरा अन् कुठं तूं पायांतल्या जोड्यामधला खडा !

**शकार** : मला शिव्या देतेश ? माझा अपमान करतेश ? विटा, उपश तें खड्ग अन् टाक मारून हिला !

**विट** : थट्टा करतां काय महाराज ! अहो, हें असलं फूल डोक्यावर घ्यायचं असतं, पायाखालीं तुडवायचं नसतं.

**शकार** : टाळी दे ! कशं माझ्या मनांतलं बोललाश. बरं तुम्ही अशं करा ! घरीं जा अन् आमच्या दोघांशाठीं शुंदर माशाचं भोजन करायला शांगा—जा—पळा. ( ते जातात ) वशंतशेने, अजून विचार कर अन् माझ्यावर प्रेम कर.

**वसंतसेना** : राजहंसावर प्रेम करणारी राजहंसी कुठं कावळ्यावर प्रेम करील ? आम्ब्यांच्या झाडावर गाणारी कोकिळा कुठं पळसाच्या झाडावर बसेल ?

**शकार** : म्हणजे तो भिकारडा चारुदत्त राजहंस अन् मी कावळा काय ? माझ्या बागेंत अन् माझ्या तोंडावर त्या चारुदत्ताची श्तुति ?

**वसंतसेना** : ते सदैव माझ्या हृदयांतच आहेत. मग मी त्यांची कां स्तुति करणार नाहीं ?

**शकार** : भुइकमळाच्या कांद्याप्रमाणें मुळाशकट त्याला तुझ्या हृदयांतून उपटून काढतो !

**वसंतसेना** : जाऊं द्या मला—मला तुझ्या डोळ्यांचं न् हातांचं भय वाटतं !

**शकार** : माझ्या नखाची धार तूं पाहिली नाहींश ! कमळाच्या देठाशारखी तुझी मान तोडून टाकीन तेव्हां कळेल !

**वसंतसेना** : चारुदत्ता, धांव—

**शकार** : पाहूं कसा येतो आहे तो ? आतां भीष्म येऊं दे नाहीं तर भीष्म

येऊं दे, विष्णु येऊं दे नाहीं तर जिष्णु येऊं दे, कुंभकर्ण येऊं दे नाहीं तर लंबकर्ण येऊं दे, जटायूनं जशी द्रौपदीला ठार मारली, चाणक्यानं जशा शीतेचा प्राण घेतला, तशा आतां मी तुला–

**वसंतसेना** : ( किंचाळते) परमेश्वर तुला पाहून घेईल !

**शकार** : कुणी पहात नाहीं मला.

**वसंतसेना** : भ्रम आहे तुझा–ते पहा दहा दिशांचे दिग्पाल तुला पहात आहेत. या वनदेवता, त्या जलदेवता, तो सूर्य, या लता, हीं झाडें, ही पृथ्वी आणि तुझ्या हृदयांतला परमेश्वर तुला पाहातो आहे.

**शकार** : परमेश्वर देवळांत अशतो, हृदयांत नशतो ! ( गळा पकडूं लागतो. )

**वसंतसेना** : ( शेवटची विनंती म्हणून ) दया कर, दया कर.

**शकार** : ( भेसूर हंसून ) दया ? कुत्र्याला पंख अशतात ? कावळ्याला शिंगं अशतात ? मला कुठून दया अशणार ?

**वसंतसेना** : काय करूं मी आतां ? कुणाला हाक मारूं ? आई, तूं कुठं आहेस ग ? प्राणप्रिया चारुदत्ता—

**शकार** : माझ्याशमोर त्याचं नांव घेतेश ? एकवेळ माझ्यावर तुझं प्रेम नशलं तरी चालेल, पण चारुदत्तावर तुझं प्रेम नाहीं अशं मला ओरडून शांग; तुला मी आत्तांच्या आत्तां शोडून देतों.

**वसंतसेना** : चारुदत्तावर माझं प्रेम नाहीं असं म्हणूं ?

**शकार** : होय वशंतशेने, एकदां तरी तसं म्हण ! तुला जिवंत राहायचं अशेल तर तशं म्हण !

**वसंतसेना** : म्हणतें, चारुदत्त फिरून डोळ्यांना दिसणार असतील तर तर म्हणतें–चारुदत्तावर माझं प्रेम—

**शकार** : नाहीं—

**वसंतसेना** : नाहीं--नाहीं–तें शक्य नाहीं. माझा जीव घेतलास तरी हे शब्द माझ्या तोंडून निघणं शक्य नाहीं ! चारुदत्तावर माझं प्रेम आहे. त्यांच्या प्रेमासाठीं माझ्या सर्वस्वाचं दान करायला मी तयार आहे.

**शकार** : ( बेफाम होऊन ) पुन्हां बोल, पुन्हां बोल—

**वसंतसेना** : एक वेळ काय पण हजार वेळां बोलेन ! तुलाच नाहीं पण साऱ्या जगाला ओरडून सांगेन ! ( ओरडते ) चारुदत्तावर माझं प्रेम आहे–चारुदत्तावर माझं प्रेम आहे !

**शकार** : ( तिला खालीं पाडून गळा दाबीत ) मग मर—मर–मर. चारुदत्तावर प्रेम करतेश काय ? मरतेश कीं नाहीं. ( वसंतसेना मूर्च्छित पडते. तिचा शेवटचा शब्द "चारुदत्त" असतो. ) कशी मेली ? माझ्यावर प्रेम करीत नाहीं ? मला नाहीं तर नाहीं–पण त्या चारुदत्ताला देखील नाहीं ! ( हंसतो; इतक्यांत "आलों–आलों महाराज" असा विटाचा आवाज येतो. शकार घाबरून तिच्यावर वाळलेलीं पानं टाकूं लागतो. )

**शकार** : पुन्हां कां आला ?

**विट** : मी चाललों होतों–पण मला वाटलं हाक मारली तुम्ही.

**शकार** : चल चालता हो. कावळा ओरडला असेल.

**विट** : ( आजूबाजूला पहात ) अन् वसंतसेना कुठं आहे ?

**शकार** : ती गेली—

**विट** : कुठं ?

**शकार** : तूं इकडून आलाश ना ? मग ती तिकडून गेली !

**विट** : पण मी तिकडूनच आलों महाराज !

**शकार** : मग ती इकडून गेली.

**विट** : खरं सांगा महाराज !

**शकार** : शांगू ? मग मी तिला मारली; ही बघ.

**विट** : अरेरे, काय केलेत हे महाराज--प्राण घेतलात तुम्ही तिचा !

**शकार** : मग ?

**विट** : आतां तुम्हांला राजदूत पकडतील !

**शकार** : काय म्हणतोश ?

**विट** : न्यायाधीश तुम्हांला शिक्षा देईल.

**शकार** : खरंच—

**विट** : तुम्हीं सुळी जाल सुळीं !

**शकार** : अरे बापरे—

**विट** : मी जातों आपला—

**शकार** : ए, ए–वशंतशेनेला ठार मारून पळून चाललाश कायरे ? चल तुला न्यायाधिशापुढें घेऊन जातों.

**विट** : भले महाराज, पाया पडतों, असं नका बोलूं !

**शकार** : कशा घाबरला ! बघ मी शांगतों, तशं केलं नाहींश तर तुला शुळावर चढवीन, अशी युक्ति आली माझ्या डोक्यांत. म्हणजे हिलाहि मारली अन् त्यालाहि मारतो. अगदीं त्याच्या कीर्तीला कलंक कां डाग काय अशतं तें लावून. बघतोश काय–हीं वाळलेलीं पानं टाक हिच्यावर ! (पाने पसरतात.) (पुटपुटत) म्हणजे एका धोंड्यांत दोन कावळे कां पांखरं काय म्हणतात ते– (जातात.)

भिक्षु भीत भीत पानाच्या ढिगाजवळ येतो व आपली ओली छाटी त्या पानावर वाळत घालूं लागतो, तों वसंतसेना हालचाल करते. पाचोळा वाजतो. भिक्षु दचकतो पुन्हां छाटी पसरूं लागतो–तोंच वसंतसेनेचा हात बाहेर येतो. त्या बरोबर सारें त्याच्या लक्षांत येतें. तो एकदम पाला दूर करतो, तो आंत निश्चेष्ट अवस्थेंत वसंतसेना पडलेली दिसते.

**भिक्षु** : आर्ये उपासके, सावध हो. ओम् नमो बुद्धाय, ओम् नमो बुद्धाय– अरेरे, एवढीसुद्धां धुगधुगी उरली नाहीं हिच्या शरीरांत !

## : : ३२

मैत्रेय बाहेर जात असतां दागिन्यांनीं भरलेला गाडा त्याच्या पायाला लागतो.

**मैत्रेय** : रदनिके, हे हे दागिनें कुठून आले या घरांत त्या नायकीणीचे ? बरं झालं मला दिसले म्हणून. चांडाळणी, चांगला फास लावला होतास धन्याच्या गळ्याला—

**रदनिका** : भलतंच काय बोलतां ? माझा काय संबंध ? सोन्याच्या गाड्याचा रोहसेनानें हट्ट धरला तेव्हां तिनंच हे दागिने बाळाला देऊन टाकले; ते तसेच पडले होते गाड्यांत !

**मैत्रेय** : छान, राजदूताच्या हातांत ते सांपडले असते म्हणजे चारुदत्ताच्या विरुद्ध चांगलाच पुरावा मिळाला असता त्या दुष्ट शकाराला ! दागिने-दागिने या नायकिणीच्या दागिन्यांनीं अगदीं पिच्छा पुरवला. आतांच्या आतां हें पाप फेंकून येतो तिच्या घरांत—

**कांहीं राजदूत येतात.**

**राजदूत** : (मैत्रेय जातांना त्याला मागें रेटित) चाललास कुठं ? आम्हीं शोध घ्यायला आलोंत या घराचा ! कुठं आहेत ते दागिनें वसंतसेनेचे ?

**मैत्रेय** : म्हटलं हें ब्राह्मणाचं घर आहे, चोराची गुहा नाहीं !

**राजदूत** : नायकिणीचा वध करणारा ब्राह्मण याच घरांत रहात होता नाहीं कां ? बघतां काय ? घराचा कोपरान् कोपरा शोधून या !

**मैत्रेय** : बसा शोधीत कल्पांतापर्यंत ! तुम्ही जाणें अन् तें घर जाणें ! मी जाऊन बसतों आपला देवळांत.

**राजदूत** : देवळांत कशाला? तुला तुरुंगच दाखवितों चांगला.

**मैत्रेय** : हा–हा–निव्वळ अन्याय आहे!

राजदूत त्याला पकडून नेतात.

: : ३३

उज्जयिनीची न्यायसभा. आसनस्थ न्यायाधिश; खालीं श्रेष्ठी, कायस्थ, राजदूत. समोर कांहीं लोक बसलेले आहेत. न्यायाधिशाच्या पुढे एका बाजूला शकार बसलेला आहे. व समोर दोषी माणसाच्या आसनावर चारुदत्त उभा आहे. बाहेर लोक अस्वस्थ झालेले आहेत.

**राजदूत** : लोक हो, शांत व्हा–शांत व्हा. न्यायदानाचं काम सुरूं होत आहे! असा विनाकारण गोंधळ करून कां आर्य चारुदत्तांचे प्राण वाचणार आहेत?

**न्यायाधीश** : आज न्यायदेवतेची कसोटी आहे. उज्जयिनी नगरांतील सर्वोत श्रेष्ठ नागरिक आणि पालक महाराजांचे एक वेळचे मंत्रि चारुदत्त हे आज मनुष्यवधाच्या आरोपावरून या न्यायासनापुढें आले आहेत. राज्यश्यालक-संस्थानक यांनीं हा आरोप त्यांच्यावर केलेला आहे. आरोप अत्यंत गंभीर आहे आणि निर्णय देण्याचं काम अत्यंत बिकट आहे. परमेश्वराला, सत्याला आणि धर्माला स्मरून मी येथें बसलों आहे. न्याय देण्याचें कामीं सर्वांनीं मला सहाय्य करावं अशी विनंति आहे. आर्य चारुदत्त, आपण बसावं.

**चारुदत्त** : न्यायदेवतेला वंदन असो.

**न्यायाधीश** : ( शकाराला ) आपण बोलावं आतां!

**शकार** : या नगरांतलें पुष्पकरंडक उद्यान आपल्याला माहीत आहे. रोज मी तिथं फिरायला जात अशतों. काल शकाळीं मी तिथं गेलों अशतांना मला तिथं एका बाईचं प्रेत कां काय म्हणतात तें दिशलें!

**न्यायाधीश** : तुम्ही ओळखतां त्या स्त्रीला ?

**शकार** : म्हणजे काय ? मी राजाचा मेहुणा आहे. या नगरांतल्या प्रत्येक स्त्रीला मी ओळखतों. माझा धंदाच आहे रोजचा हा. ( लोक हंसतात. )

**न्यायाधीश** : शांत-शांत ! कोण होती ती ?

**शकार** : दुशरी कोण ? वशंतशेना ! तिच्या अंगावर एक शुद्धां दागिना नव्हता, तेव्हां दागिन्याच्या लोभानं कुणीतरी तिचा गळा दाबून प्राण घेतला अशावा.

**न्यायाधीश** : कुणीतरी म्हणजे ?

**शकार** : कुणी तरी—कुणी तरी—म्हणजे मी नाहीं अं—

**न्यायाधीश** : "मी नाहीं अं" हे ह्यांचे शब्द टिपून घ्या.

**शकार** : ते कशाला लिहताय्. माझा आरोप चारुदत्तावर आहे.

**चारुदत्त** : हर हर ! काय बोलता ? हें दुष्ट कर्म मी करीन तरी कसं ?

**शकार** : कशं म्हणजे—हातानं—हें अशं—हें अशं ! ( चेटाचा गळा दाबतो. लोक हंसतात. )

**न्यायाधीश** : बरं, तें प्रेत कुठं आहे आतां ?

**शकार** : तीच तर गंमत आहे ! मी राजदूत घेऊन फिरून तिथं जातोय तों प्रेताचा पत्ता नाहीं.

**न्यायाधीश** : म्हणजे ?

**शकार** : म्हणजे काय ? अहो ज्यानं वशंतशेनाचा वध केला, त्यानंच तिचं प्रेत देखील नाहींशं करून टाकलं ! ( हंसतो )

**न्यायाधीश** : तुमच्या या म्हणण्याला यापेक्षां दुसरा कांहीं पुरावा आहे ?

**शकार** : पुरावा ?—पुरावा शगळा आणून बशवला आहे बाहेर. अरे, त्या रंभेला हाका मार.

**राजदूत** : रंभा–रंभा कंचनी हजर आहे !

**रंभा** : ( रडत आंत येते ) कुठं आहे माझी मुलगी ? दाखवा मला ! माझी मुलगी मला परत पाहिजे--नाहीं तर मी प्राण देईन !

**शकार** : ए म्हातारे !

**रंभा** : अं ऽ ऽ ?

**शकार** : रडायला काय झालं तुला ? गप बश.

**न्यायाधीश** : तुम्ही कां बोलतां मधें ? बाई, बस तिथं--अन् तुझं दुःख आवर. शांत हो बाई, प्रसंगाला तोंड दिलंच पाहिजे. आतां सांग, तूंच वसंतसेनेची आई ना ?

**रंभा** : होय महाराज.

**न्यायाधीश** : काय नांव तुझं ?

**रंभा** : रंभा !

**शकार** : वशंतशेनेच्या बापाचं नांव शांग !

**न्यायाधीश** : त्याच्याशीं आपल्याला काय करायचंय् ?

**शकार** : बरं नको ! बाकी तिलाही तें आतां आठवायचं नाहीं म्हणा.

**न्यायाधीश** : वसंतसेना घरांतून कोणत्या दिवशीं बाहेर गेली ?

**रंभा** : परवाचे दिवशीं संध्याकाळीं महारज ! आभाळ भरून आलं होतं-अंधार पडायला लागला होता. ती घाईघाईनं बाहेर जाऊं लागली, तेव्हां मी तिला अडवलं अन् म्हणाले चांगली कीं, वसंतसेने, अशा भलत्यावेळीं तूं बाहेर जाऊं नकोस, पण तिनं माझं ऐकलं नाहीं ! म्हणाली मी रात्रीं येणार नाहीं. तीच माझी न् तिची शेवटची भेट !

**न्यायाधीश** : त्या रात्रीं ती कुठं गेली असावी ?

**रंभा** : एका मित्राच्या घरीं गेली होती ती—

**न्यायाधीश** : अस्सं ! काय त्या मित्राचं नांव ?

**रंभा** : पुरुषांचीं नावं सांगणं ही आम्हा नायकिणींची नीति नाहीं !

**शकार** : अरे वारे वा नायकिणीची नीति !

**न्यायाधीश** : (शकाराला गप्प करीत) बाई, हें न्यायासन आहे. इथं साऱ्या गोष्टी सांगाव्या लागतात !

**रंभा** : त्यांचं नांव चारुदत्त ! यौवनसुखाचा अनुभव घेण्याकरतां माझी कन्या त्यांच्याकडे गेली होती.

**शकार** : हें–हें आधीं लिहून घ्या. यौवनशुखाचा अनुभव घेण्याशाठी ती गेली होती !

**न्यायाधीश** : हेच ना ते चारुदत्त ?

**रंभा** : होय महाराज, उदंड आयुष्य असो त्यांना !

**न्यायाधीश** : आर्या, या स्त्रीच्या कन्येबरोबर आपली ओळख, स्नेह, मैत्री, प्रीति कांहीं होती कां ?

चारुदत्त लाजतो.

**शकार** : बोल, आतां कां लाजतोश ! तिच्या यौवनशुखाचा अनुभव घेऊन तिचा जीव घेतोश--अन् वर फिरून लाजतोश ?

**चारुदत्त** : वसंतसेना जरी गणिका असली, तरी तिच्यावर माझी प्रीति आहे, हें सांगायला मला कसलीच लाज वाटत नाहीं. हा जर अपराध असेल तर तो माझ्या यौवनाचा आहे—चारित्र्याचा नाहीं.

**न्यायाधीश** : परवां रात्रीं जर ती तुमच्या घरीं होती तर ती आतां कुठं आहे ?

**चारुदत्त** : मला माहीत नाहीं.

**शकार** : माहीत नाहीं काय ?

**न्यायाधीश** : काल पुष्पकरंडक उद्यानांत तुम्ही तिला भेटला नाहींत ?

**चारुदत्त** : मी जीर्णोद्यानांत गेलों होतों. पण ती तिथं आली नाहीं—

**शकार** : त्या वर्धमानकाला बोलवा आंत.

**राजदूत** : वर्धमानक–वर्धमानक हजर आहे ? ( वर्धमानक येतो. )

**शकार** : हा चारुदत्ताचा गाडीवान आहे. विचारा ह्याला.

**न्यायाधीश** : काल यांनी गाडी घेऊन तूं उद्यानांत गेला होतास ?

**वर्धमानक** : होय महाराज.

**न्यायाधीश** : कोण होतं गाडींत त्या ? ( वर्धमानक घुटमळतो )

**शकार** : मी शांगतो--त्या गाडींत वशंतशेना होती ! चारुदत्ता, भरली तुझा पन्नाश का शंभर वर्षं--काय म्हणतात ते !

**न्यायाधीश** : सांग कोण होतं गाडींत त्या ?

**वर्धमानक** : तें मी सांगणार नाहीं !

**शकार** : शांगणार नाहीं ! कशा शांगत नाहीं तें पाहातो. मिरच्याची धुरी मिळेल तेव्हां कळेल !

**वर्धमानक** : मला सुळावर चढवलं तरी माझ्या तोंडून एक अक्षर निघणार नाहीं त्याबद्दल.

**चारुदत्त** : महाराज, मी शपथेवर सांगतों, त्या गाडींत वसंतसेना नव्हती !

**न्यायाधीश** : मग कोण होतं ?

**चारुदत्त** : तें मला सांगतां येत नाहीं.

**न्यायाधीश** : न्यायाची आज्ञा आहे तुम्हांला !

**चारुदत्त** : या राज्यांतल्या न्यायापेक्षां श्रेष्ठ असा जो परमेश्वरी न्याय त्याला मी वचनानं बांधला गेलों आहे. मला सांगतां येत नाहीं !

**न्यायाधीश** : आर्या, न्यायदेवताला, आपण संकटांत टाकूं नका !

**चारुदत्त :** पण मी म्हणतों महाराज, वसंतसेना जिवंत आहे; ती मेली नाहीं.

**शकार :** आहे-जिवंत आहे श्वर्गात. इंद्राच्या श्वयंपाकघरांत माशे तळीत बसली आहे.

**चारुदत्त :** महाराज, या दुष्ट, असत्य बोलणाऱ्या घातकी माणसाच्या बडबडीवर कोणता विचारी मनुष्य विश्वास ठेवील ? अरे, फुलं तोडतांना पान तुटेल म्हणून जो लतेला ओढून वाकवीत सुद्धां नाहीं, तो हा चारुदत्त त्या सुंदर स्त्रीच्या कोमल देहाला दागिन्याच्या लोभानं कसा अपाय करील बरं ?

**रंभा :** खरं आहे महाराज ! घरीं ठेवलेले अलंकार चोरांनीं हरण केलें तेव्हां पृथ्वीमोलाची रत्नमाला ज्यानं वसंतसेनेला देऊं केली, तो चारुदत्त दागिन्याच्या लोभानं हें असं करील असं तुम्हांला वाटतं तरी कसं ?

**शकार :** ए थेरडे, आतां गप बशायला काय घेशील ?

**न्यायाधीश :** हें पहा संस्थानक, वसंतसेनेचे दागिने चारुदत्तानं घेतले असा जोंपर्यंत पुरावा नाहीं, तोंपर्यंत चारुदत्तावरचा वधाचा आरोप सिद्ध होणार नाहीं.

**शकार :** मी शांगतों सिद्ध झाला पाहिजे. मी राजाचा मेहुणा आहे. मी काय खोटं शांगतो आहे !

**लोक :** खोटं ! खोटं !! खोटं !!! दागिन्याचा पुरावा कुठं आहे ? चारुदत्त निर्दोषी आहे ! चारुदत्ताला सोडून द्या.

**शकार :** मी शांगतों--दागिनें चारुदत्तानं आपल्या घरीं लपवून ठेवले आहेत. राजदूत आतां घेऊन येतील शारा मुद्देमाल ! मग करतो शारं सिद्ध. ( मैत्रेयाला घेऊन राजदूत येतात. ) हे आलेच राजदूत ! अं, हा थेरडा देखील शापडला कां ? छान झालं--छान झालं !

**मैत्रेय :** निवळ अन्याय आहे हा. घरदार, संपत्ति सारं हिरावून घेतल्यावर रोज रोज आमच्या घराची झडती म्हणजे आहे काय !

**शकार :** काय रे, कुठं आहेत दागिने ?

**राजदूत :** महाराज, चारुदत्ताचं सारं घर शोधून पाहिलं पण कुठं दागिनें सांपडले नाहींत !

**शकार :** ( प्रक्षुब्ध होऊन ) दागिनें शांपडले नाहींत !

**लोक :** दागिनें सांपडले नाहींत. चारुदत्त निर्दोषी आहे.

**शकार :** नाहीं—नाही--चारुदत्त निर्दोषी नाहीं—त्यानंच वशंतशेनाचा वध केला आहे.

**रंभा :** चारुदत्त निर्दोषी आहे.

**शकार :** खोटं—खोटं—

**लोक :** चारुदत्तांना सोडून द्या.

**न्यायाधीश :** शांत व्हा. शांत व्हा ! बोला आतां तुमचं काय म्हणणं आहे ?

**शकार :** हा सारा पक्षपातानं अन्याय होतो आहे—मला न्याय पाहिजे. मला न्याय पाहिजे. मला न्याय पाहिजे.

**मैत्रेय :** थांब तुला न्याय देतों; माकडा, घुबडा, दोपभांडा—थांब. या सोट्यानं तुझं डोकंच फोडतों. ( मैत्रेय सोटा उगारतो. त्याच्या बगलेंतील दागिने खालीं पडतात. )

**शकार :** हेच—हेच ते वशंतशेनेचे दागिनें ! पुरावा मिळाला. अपराध सिद्ध झाला, न्यायाधीश निकाल शांगा. चारुदत्ताला शुळावर चढवा.

**न्यायाधीश :** काय हो—हे कोणाचे दागिनें ?

**शकार :** बोल थेरड्या, बोल ! आतां कां तुझी बत्तीशी बशली ? मला शोटा दाखवत होताश नाहीं का ?

**न्यायाधीश :** हे दागिनें रंभेला दाखवा. बाई, तूं हे दागिनें ओळखतेस ?

**रंभा :** म्हातारपणामुळं मला नीटसं दिसत नाहीं महाराज !

**शकार :** लांबून येणारीं गिऱ्हाइकं तुझ्या माडीच्या खिडकींतून दिशतात

अन् हे दागिने तुला ओळखतां येत नाहींत काय ? बोल, वशंतशेनेचेच दागिने आहेत कीं नाहीं हे !

**रंभा:** तें मी कसं सांगूं महाराज ? सगळ्याच बायकांचे दागिने सारखे दिसतात.

**चारुदत्त :** आर्ये, मला वाचवण्यासाठीं कशाला विनाकारण असत्य बोलतेस ? महाराज, हे वसंतसेनेचेच दागिने आहेत.

**न्यायाधीश :** अस्सं, मग ते तुमच्या घरांत कसे आले ?

चारुदत्त बोलत नाहीं.

**मैत्रेय :** महाराज मी सांगतों. आर्यांचा मुलगा जो रोहसेन, त्यानं सोन्याच्या गाड्याचा हट्ट धरला, तेव्हां वसंतसेनेनें हे दागिने मातीच्या गाड्यांत भरले ! ते मी परत करायला निघालों होतों !

**शकार :** *शाफ खोटं आहे हें ! या गांवांतल्या नायकिणी उंबरा ओलांडायला दोन दोन मोहरा घेतात, त्या आपले दागिने दुशऱ्याला देतील होय ?* न्यायाधीश, वशंतशेनेचे दागिनें चोरण्याच्या कामीं यानं चारुदत्ताला शहाय्य केलं अशा माझा या म्हाताऱ्यावर आरोप आहे.

**मैत्रेय :** महाराज, ज्या पुरुषानं लोककल्याणासाठीं बागा, देवालयं, तळीं बांधून या उज्जयिनी नगराला शोभा आणली, ज्यानं आपली कुबेरासारखी संपत्ति कर्णाच्या औदार्यानं गोरगरीबांना वाटून टाकली, तो हा महात्मा, आज दरिद्री झाला म्हणून, दागिन्याच्या लोभानं हें अघोर कर्म करील असं तुम्हांला वाटलं तरी कसं ?

**न्यायाधीश :** तुम्ही चारुदत्ताचे मित्र म्हणवतां ना ?

**मैत्रेय :** होय महाराज.

**न्यायाधीश :** अष्टौप्रहर तुम्ही त्यांच्याबरोबर असतां ?

**मैत्रेय :** होय महाराज !

**न्यायाधीश :** मग आतां मला सांगा, काल सकाळी तुम्ही त्यांच्याबरोबर होतां ?

**मैत्रेय :** हो, नाहीं...नव्हतों.

**शकार** : जानव्यावर हात ठेवून शांग होता का नव्हता ?

**मैत्रेय** : ( जोरानें ) नव्हतों.

**न्यायाधीश** : मग चारुदत्त त्यावेळीं कुठं होता ?

**मैत्रेय** : चारुदत्त त्यावेळीं......तें मला सांगतां येत नाहीं !

**शकार** : न्यायाधीश, आरोप शिद्ध झाला. आतां कशाला प्रश्न विचारतां ? आतां शिक्षा शांगा आटपा.

**न्यायाधीश** : आर्या, न्यायदेवतेपासून कांहीं तरी लपवून ठेवण्याचा आपण हेतुपुरस्सर प्रयत्न करीत आहांत. असं करण्यांत आपला कांहींही हेतु असला तरी त्यामुळें एक भयंकर प्राणसंकट आपण आपल्यावर ओढवून घेत आहांत हें मी आपल्याला बजावून सांगतों. यापुढें आपल्याला काय उत्तर द्यायचं असेल तें नीट विचार करून द्या. वसंतसेनेचा ज्या क्षणाला हा भीषण वध झाला, त्यावेळीं आपण कुठें होतां—कुणाबरोबर होतां-हें आधीं मला सांगा !

**चारुदत्त** : महाराज, क्षमा करा—या प्रश्नाचं उत्तर मला देतां येत नाहीं. मग त्यासाठीं मला माझ्या प्राणाचं मोल द्यायला लागलं तरी चालेल !

**शकार** : प्राणाचं मोल द्यायला तयार आहे हा महाराज. आतां शिक्षा शांगा— कां वेळ दवडतां ?

**न्यायाधीश** : चारुदत्ता, वसंतसेनेच्या वधाचा अपराध, सर्व पुराव्यांनीं तुझ्या विरुद्ध झाला असं सांगण्यावांचून आतां मला गत्यंतर नाहीं. आतां त्या आसनावरून तुला उठावं लागेल ! तुला कांहीं सांगायचं आहे ?

**चारुदत्त** : आपण कसाही निर्णय देणार असला तरी मी निरपराधी आहे अशीच माझी मनोदेवता मला साक्ष देत आहे. निष्पाप, निष्कलंक, चारित्र्य-संपन्न अशा गोत्रांत माझा जन्म झाला आहे एवढंच मी आपल्याला सांगतों. वसंतसेना जिवंत नाहीं असं आपण म्हणतां, हें जर खरं असेल तर आतां जगण्यांत तरी काय अर्थ आहे ?

**रंभा :** महाराज, कृपा करा. माझी मुलगी मेली असेल तर तिचं आयुष्यच संपलं असं मी म्हणेन. पण हा महापुरुष दीर्घकाळ जगावा एवढीच माझी प्रार्थना आहे.

**शकार :** ए थेरडे, आतां घरीं जा. अन् दारू पिऊन देवपूजेला लाग जा !

**न्यायाधीश :** अपराधी पुरुषा, वसंतसेनेचा वध केल्याबद्दल मी तुला शिरच्छेदाची शिक्षा सांगत आहे.

**शकार :** ( आनंदानें ) पालक राजाच्या न्यायाचा जयजयकार—

**मैत्रेय :** ( तळतळून ) परमेश्वराच्या न्यायाचा जयजयकार !

## : : ३४

उज्जयिनी नगरींतील वधस्थानाकडे जाणारा एक रस्ता. चारुदत्ताची वधयात्रा चाललेली आहे. पुढें वाद्यें वाजत आहेत. दोन चांडाळांच्यामध्यें चारुदत्त असून त्याला लोखंडी सुळाला बांधलेलें आहे. त्याचें सर्वांग लाल असून त्याच्या गळ्याभोंवतीं तांबड्या फुलांची माळ आहे. त्याचा चेहेरा खिन्न पण शांत दिसत आहे. जवळूनच एक कसाई मेंढ्यांचा कळप घेऊन जात आहे.

**भिक्षु :** बुद्धम् सरणम् गच्छामि—संघम् सरणम् गच्छामि—धम्मम् सरणम् गच्छामि—लोकहो, जिवाची हिंसा करूं नका—बुद्धाला शरण जा. लोकहो, बुद्धाला शरण जा. धर्माचं रक्षण करा.

**एक जण :** चल हो बाजूला—चारुदत्त तिकडे सुळीं चाललाय अन् या लेकाला म्हणे भिक्षा घाला !

**भिक्षु :** काय म्हणतां आर्य चारुदत्त अन् सुळीं ? तें काय म्हणून ! दंवडीची झांजट वाजते.

**तो गृहस्थ :** ती दंवडी ऐक.

**चांडाळ :** पौरजनहो, ऐका हो ऐका, हा विजयदत्ताचा नातू आणि सागर-

दत्ताचा मुलगा; याचं नांव चारुदत्त. उज्जयिनी नगरींतील गणिका वसंतसेना हिला धनलोभास्तव पुष्पकरंडक उद्यानांत नेऊन यानें बलात्कारानें आणि बाहुपाशानें मारली म्हणून याला शिरच्छेदाची शिक्षा देण्यांत आली आहे. जर कोणी असा अपराध करील तर पालकराजा त्याला देहांत शासन देईल होऽऽऽ !

बुद्ध भिक्षु घाईघाईनें जातो.

: : ३५

एक भिक्षूंचा आश्रम. वसंतसेना बेशुद्ध अवस्थेंत तेथें पडलेली आहे. बरेच भिक्षु ती शुद्धीवर येण्यासाठीं प्रार्थना करीत आहेत.

: : ३६

एक भिक्षु गर्दीतून मार्ग काढीत आहे.

: : ३७

भिक्षूंचा आश्रम

**१ भिक्षु :** *श्रमणका, बघतोस काय ? विहाराच्या दक्षिणेस असलेल्या संजीवनी* वनस्पतीची पानं चटकन घेऊन ये. त्याचा रस इच्या डोळ्यांत घातला कीं एका क्षणांत ती शुद्धीवर येईल.

**२ भिक्षु :** आज्ञा उपासका.

: : ३८

बुद्ध भिक्षु गर्दीतून वाट काढीत चाललेला आहे, वर एका सौधतलावरून तें दृश्य शकार पहात आहे.

**शकार** : अरे हे चांडाळ करतात तरी काय ? अजून मारलं नाहीं त्यांनीं चारुदत्ताला ! ए, अरे त्यांना म्हणावं आटपा कीं लवकर. तेवढ्याशाठीं माझं जेवण खोळंबलंय् ! अरे बापरे, काय ही गर्दी ! या भिकारड्या चारुदत्ताचा वध पाहायला इतके लोक जमले तर माझ्याशारख्या श्रेष्ठ माणशाला शुळीं दिलं तर किती गर्दी जमेल, नाहीं रे विटा !

: : ३९

बुद्धाश्रमांतील प्रार्थना संपते, तरी वसंतसेना शुद्धीवर येत नाहीं. इतक्यांत भिक्षु धांवत येतो.

**भिक्षु** : वसंतसेने—वसंतसेने—काय अजून ही शुद्धीवर आली नाहीं ! वसंतसेनें, डोळे उघड. जागी हो. अरेरे, ही जर शुद्धीवर आली नाहीं तर आर्य चारुदत्ताचा निष्कारण शिरच्छेद होईल.

**२ भिक्षु** : काय आर्य चारुदत्ताचा शिरच्छेद ?

**१ भिक्षु** : होय, वसंतसेनेच्या वधाच्या आरोपावरून आर्यांना शिरच्छेदाची शिक्षा झाली आहे.

**सारे भिक्षु** : वसंतसेने—वसंतसेने—जागी हो—जागी हो—

: : ४०

वधस्तंभाचें दृश्य. मैत्रेय रोहसेनाला घेऊन वाट काढीत आहे.

**रोहसेन** : तात--तात—

**मैत्रेय** : मित्रा चारुदत्ता—

**चारुदत्त** : ( दोघांना हृदयाशीं धरून ) अहाहा, राजा आणि रंक ज्याला सारख्याच प्रेमानें कवटाळतात तो हा माझ्या सुखसर्वस्वाचा ठेवा ! असा पुत्र आणि असा मित्र असल्यावर मी सुखानं वधस्तंभावर चढेन.

चांडाळ डोळ्यांतील अश्रू पुसतो.

**रोहसेन** : तात, मला एकट्याला सोडून कुठं चाललांत ?

**मैत्रेय** : मित्रा, उद्यां मी तुला कुठं शोधूं रे ?

**चारुदत्त** : बाळा, शांत हो. मित्रा हें काय ? तुमच्या डोळ्यांतील अश्रुधारांनीं माझ्या धैर्याचा पर्वत खचेल, अन् मला मृत्यूचं भय वाटूं लागेल. रडूं नका. ( गळ्यांतलं जानवं रोहसेनाला देतो. ) ही घे माझी शेवटची आठवण. माझ्या सत्तेचं एवढंच भूषण माझ्याजवळ उरलेलं आहे. आणि लक्षांत ठेव सत्यासाठीं वधस्तंभावर चढणाऱ्या पित्याचा तूं पुत्र आहेस ! कर्तव्य विसरूं नकोस. मरणाला भिऊं नकोस !

: : ४१

**शकार** : छेः छेः काय हा उशीर ? मी तेथें गेल्याशिवाय हें काम व्हायचं नाहीं. चेटा, अंबारीची तयारी करायला शांग लवकर !

## : : ४२

वसंतसेना अद्यापि बेशुद्धच आहे.

**भिक्षु** : हिला अशा स्थितींत जरी तिथं नेलं तरी काम होईल.

## : : ४३

भिक्षू डोलींतून वधस्तंभाजवळ वसंतसेनेला आणतात. शकाराचा हत्ती येत आहे. लोक कुजबुजत आहेत.

**एक जण** : उज्जैनीच्या सद्गुणाचा सांठा आज लयाला जाणार !

**दुसरा** : अन् ते आम्हीं उघड्या डोळ्यांनीं पहाणार !

**तिसरा** : पालक राजाचा पापाचा घडा आज पुरता भरला म्हणून समजा !

**चौथा** : आजपर्यंत शेंकडो गरिबांच्या प्राणाचे बळी घेतले त्यानं !

**पांचवा** : पण आज आमच्या काळजाचा लचकाच तोडलान् !

**सहावा** : याचा सूड घेतल्याशिवाय आम्ही राहाणार नाहीं !

**सातवा** : चारुदत्ताच्या रक्ताच्या एका थेंबासाठीं पालक राजाच्या सिंहासनाची आम्हीं शकलं शकलं उडवूं !

दरवाजांत भिक्षूंना राजदूत अडवतात.

**राजदूत** : ए मार्गे सरा. शकरांची स्वारी येते आहे रस्ता सोडा.

**भिक्षु** : आम्हांला जाऊं द्या—आम्हाला जाऊं द्या—बुद्धाच्या नांवासाठीं—धर्माच्या कामासाठीं आम्हाला जाऊं द्या. एका निरपराध जिवाची हिंसा होते आहे. आम्हांला जाऊं द्या !

**राजदूत :** आतां जास्त वटवट कराल तर हत्तीच्या पायाखालीं तुमचीच हिंसा होऊन जाईल.

: : ४४

**चारुदत्त :** सर्वे वै सुखिनः सन्तु—सर्वे सन्तु निरामयाः ।
सर्वे भद्राणि पश्यन्तु—न कश्चित् दुःखभाग् भवेत् ॥

लोक चारुदत्ताभोंवतीं गराडा घालतात.

**शकार :** ए, बघतां काय ? तुडवा या लोकांना घोड्यांच्या टापाखालीं ! चारुदत्ताची बाजू घेतात–अन् माझ्याशमोर ? तुडवा घोड्यांच्या टापांखालीं ! हाणा, मारा, कापून काढा.

: : ४५

बाजूला भिक्षु वसंतसेनेला पाला हुंगावयास देतो.

**वसंतसेना :** ( अर्धवट शुद्धींत ) आर्या चारुदत्ता !

**भिक्षु :** ओम् नमो बुद्धाय—आर्ये, आर्ये ऊठ--सावध हो.

: : ४६

**शकार :** अश्शं--अश्शं --- अशांच तुडवून काढा शगळ्यांना --- अन् कायरे चांडाळांनो, तुम्ही कशाला थांबलाय् ? आटपा–शिरच्छेद करून टाका याचा !

अशं शफाईनं याचं डोकं उडवा कीं चेंडूशारखं ताडकन् उडालं पाहिजे आभाळांत ! ( हंसतो )

**चारुदत्त :** बाळा, तूं आतां जा.

**रोहसेन** नाहीं--नाहीं तुम्हाला सोडून हलणार नाहीं इथून.

**शकार :** आटपा--आटपा लवकर.

**रोहसेन :** महाराज, मी पायां पडतों, मला मारा, पण माझ्या तातांना सोडा.

**शकार :** हें--हें ह्याचं कारटं कीं काय ? ए मग अशं करा, दोघांनाही एकदम मारून टाका म्हणजे मागाहून कटकट नको.

**न्यायप्रतिनिधि :** थांबा--असं बोलणं आपल्यासारख्याला शोभत नाहीं. न्यायासनाच्या आज्ञेवांचून कोणालाही अपाय करण्याचा अधिकार तुम्हाला नाहीं.

**शकार :** अंऽऽअश्शं काय ? मी राजाचा मेहुणा आहे अन् नगररक्षक आहे. पाहून घेईन. पाहून घेईन.

**चारुदत्त :** मित्रा, न्यायाची देखील हा नीच पर्वा करणार नाहीं. याला इथून घेऊन जा. नाहीं तर हा मूर्ख एखादेवेळीं याच्या प्राणाला अपाय करायचा !

मैत्रेय रोहसेनाला ओढून नेतो. त्याच्या "तात–तात" अशा किंकाळ्या ऐकूं येतात.

**शकार :** हं, आटपा–निदान या चारुदत्ताला तरी लवकर ठार करा !

वसंतसेना गर्दीतून वाट काढीत आहे.

**वसंतसेना :** थांबा--थांबा--आर्यांना मारूं नका. मी जिवंत आहे.

**भिक्षु :** बाजूला व्हा--लोकहो, बाजूला व्हा.

**लोक :** कोण ही ?

**भिक्षु :** हीच ती वसंतसेना !

**लोक** : काय वसंतसेना जिवंत आहे ? मग चारुदत्त निर्दोषी आहे, त्याला सोडून द्या !

**शकार** : अरेच्या, या लोकांना अजून खरं वाटत नाहीं. (चारुदत्ताला) ए भिकारड्या, तूं खरं बोलणारा आहेस ना ? मग बोल, वशंतशेनेला तूंच मारलीश कीं नाहीं ? बोल, नाहीं तर या चाबकांनीं फोडून काढतों तुझी पाठ. नाहीं बोलत--अजून नाहीं बोलत. चांडाळ, उडवा याच्या पाठीवर कोरडे ! (चांडाळ चाबूक सरसावतो.)

**चारुदत्त** : खड्गाचा घाव सहन करायला जिथं माझी मान तयार आहे, तिथं चाबकाच्या फटकाऱ्याचं मला काय भय दाखवतोस ? गोहत्त्येच्या, ब्रह्महत्त्येच्या किंवा राजहत्त्येच्या पातकामुळं मी जर प्राणाला मुकलों असतों तर मला वाईट वाटलं नसतं पण आपल्या प्रीतिदेवतेच्या हत्येचा आरोप--अरेरे, हें मी कसं सहन करूं ?

**शकार** : लोकहो, पहा हा बोलत नाहीं, तेव्हां यानंच वशंतशेनेला मारलं हें याला कबूल आहे. चांडाळ, आटपा आटपा--लवकर.

: : ४७

शर्विलक रस्त्यामध्यें घोड्यावरून येतो. लोकांची गर्दी जमलेली आहे.

**शर्विलक** : लोकहो, आपला विजय झाला. या—या हातांनीं त्या दुष्ट पालक राजाचा मी वध केला. लोकहो, त्याच्या रक्तानं रंगलेले हे माझे हात बघा. आजपासून अन्यायाची राजवट संपली ! आतां यापुढें आपला राजा गोपालपुत्र आर्यक !

**लोक** : आर्यक महाराजांचा जयजयकार !

**शर्विलक** : चला, माझ्याबरोबर वधस्तंभाकडे चला. आर्य चारुदत्ताची आतांच्या आतां सुटका करून त्या नीच राजशालकाला सुळावर चढवूं !

त्यावांचून आजच्या आनंदाच्या दिवसावर सोन्याचा कळस चढणार नाहीं.

**लोक** : आर्य चारुदत्ताचा जयजयकार !

: : ४८

**चांडाळ** : चारुदत्ता, स्मरण करायचं असेल तर कर.

**शकार** : अेरे आटपा. कशलं श्मरण न काय ! आतां मरणाचं बोला, श्मरणाचं काय बोलतायू ?

**चारुदत्त** : धर्मावांचून मी कुणाचं स्मरण करूं ?

**शकार** : ए काय रे, याला मेल्यावर कुठं जाळायचं ? नाहीं तर अशं करा. याला जाळूं नका. इथंच पडूं द्या याचं प्रेत, म्हणजे घारी, गिधाडांची चांगली चंगळ होईल—

**चारुदत्त** : हाय रे दुर्दैवा !

**शकार** : भितोय--मरणाला भितोय कीं रे हा !

**चारुदत्त** : मूर्खा, मी मरणाला भीत नाहीं. कीर्तीला कलंक लागला म्हणून माझे प्राण कासावीस होत आहेत. न भीतो मरणादस्मि—दूषितं केवलं यशः ।

( वधाशिलेवर डोकं ठेवतो. )

*भिक्षु वसंतसेनेला वधस्तंभाकडे आणत आहेत.*

**वसंतसेना** : थांबा—आर्यांना मारूं नका. मी जिवंत आहे. मी जिवंत आहे.

गर्दीमुळें ती बेशुद्ध होते.

**भिक्षु** : अेरेरे, फारच मोठी मूर्च्छा आली हिला ! आतां मात्र चारुदत्ताच्या आयुष्याची दोरी तुटली--आतां वेळ नाहीं—अशीच घेऊन चलूं या हिला.

*वधाच्या वेळचीं वाद्यें वाजूं लागतात.*

**चांडाळ** : जय शंकर—जय चंडिकामाता.

**भिक्षु** : थांबा—थांबा. वसंतसेना जिवंत आहे. जरा थांबा, आतां इतक्यांत ती इथं येईल. निर्दोषी चारुदत्ताचा वध करूं नका.

**शकार** : वेड लागलंय् याला - बघतां काय आटपा लवकर !

**भिक्षु** : नाहीं. निरपराध जिवाची हिंसा मी होऊं देणार नाहीं—( भिक्षु मधें पडतो. चांडाळ त्याला उचलतो. )

**लोक** : वसंतसेना जिवंत आहे, चारुदत्त निर्दोषी आहे, त्याला सोडून द्या. चारुदत्त निरपराधी आहे.

**शकार** : नाहीं, चारुदत्त निर्दोषी नाहीं, त्यानंच वशंतशेनेला मारली आहे. तो निर्दोषी नाहीं. चांडाळ, बघतोश काय ? आटप लवकर—नाहीं तर आण तें शस्त्र इकडे. ( चांडाळ त्याला बाजूला सारतो. )

वसंतसेनेला भिक्षु आणत आहे. ती शुद्धीवर येते.

**वसंतसेना** : थांबा—थांबा, आर्यांना मारूं नका—मी जिवंत आहे. मी आलें. आर्या, बघा मीं आलें. आर्या—आर्या—

**चारुदत्त** : वसंतसेने—आर्ये. ( एकमेकास भेटतात. )

**भिक्षु** : न्यायप्रतिनिधि बघा—वसंतसेना जिवंत आहे. सोडून द्या आर्यांना.

**शकार** : आं, ही वशंतशेना ? छट्ट मी शांगतों—मी शांगतों ती मेली आहे.

**भिक्षु** : कशावरून ?

**शकार** : म्हणजे, मी माझ्या हातांनीं तिला ठार मारली आहे. ही अशी.

**न्यायप्रतिनिधि** : न्यायाची आज्ञा आहे. पकडा याला. ( शकार पळतो. लोक त्याच्या पाठीमागें पळतात व त्याच्यावर धोंडे मारतात. )

**शर्विलक** : (प्रवेश करून) पालक राजाचा वध झाला ! अन्यायाचा नि:पात झाला—आर्यक महाराजांचा जयजयकार—

**वसंतसेना** : मला क्षमा करा महाराज, खऱ्या प्रेमाची किंमत मी माझ्या अलंकारांनीं करायला गेलें, म्हणून आपणा दोघांवर हें प्राणसंकट ओढवलें.

मैत्रेय व रोहसेन येतात.

**रोहसेन** : तात—तात—

**मैत्रेय** : मित्रा—

**शर्विलक** : आर्यक महाराजांचा जयजयकार. आपल्या आशीर्वादानं गोपालपुत्र आर्यक आजपासून उज्जैनीचे राजे झाले. उज्जैनीच्या स्वातंत्र्याला आपला आशीर्वाद असावा !

**चारुदत्त** : अहाहा—माझे प्राण परत मिळाल्यापेक्षां उज्जैनीचं स्वातंत्र्य आज परत मिळालं म्हणून मला जास्त आनंद होत आहे. उज्जैनीच्या स्वातंत्र्याचा जयजयकार–आर्यक महाराजांचा जयजयकार !

: : ४९

उज्जैनीच्या एका चौकांत आर्यकाला लोकांनीं गराडा घातला आहे.

**लोक** : आर्यक महाराजांचा जयजयकार ! आर्यक महाराजांचा जयजयकार !

**आर्यक** : नका, माझा जयजयकार करूं नका. हा तुमचा जयजयकार आहे. हा जनतेचा जयजयकार आहे. हा सत्याचा अन् न्यायाचा विजय आहे. स्वार्थासाठीं जनतेच्या हिताला पायाखालीं तुडवणाऱ्या दुर्मद राजाला लोकांच्या न्यायासनासमोर काय शासन मिळतं हें तुम्हीं पाहिलेलं आहे. आजपासून आपली उज्जैनी स्वतंत्र झाली आहे. या नगरीचं राज्य हें माझं नाहीं, तुमचं आहे ! राजा हा प्रजेचा स्वामी नसतो, दास असतो हें ध्यानांत ठेवा

**लोक** : आर्यक महाराजांचा जयजयकार. आर्यक महाराजांचा जयजयकार.

**शकार** : ( पळत येतो. ) मेलों–मेलों मला वाचवा.

**राजदूत** : चल महाराजासमोर.

**शकार** : अरे, मी राजाचा मेहुणा आहे.

**राजदूत** : तो राजा गेला स्वर्गाला. बोल, आर्यक महाराजांचा जयजयकार.

**शकार** : मला सोडून द्या. मग मी वाटेल त्याच्या नांवाचा जयजयकार करतों. ए तुझं नांव काय—तुझा सुद्धां जयजयकार करतों.

**राजदूत** : महाराज, हाच तो दुष्ट संस्थानक.

**आर्यक** : बोला, याला कोणतं शासन करूं—

**शकार** : चारुदत्ता, वाचलास ना बाबा तूं ! छान झालं ! आतां मला देखील वाचव, म्हणजे शेवट आपला चांगला होऊन जाईल.

**चारुदत्त** : महाराज, आत्तांचे आत्तां त्याला सोडून द्या.

**आर्यक** : ठीक.

**शकार** : मेलों होतों पण वांचलों ! ( पळून जाऊं लागतो. )

**चारुदत्त** : अहो संस्थानक, चालला कुठं ?

**शकार** : आपलं असंच—

**चारुदत्त** : महाराज, किती केलं तरी हा आमचा जुना मित्र आहे. याला फिरून नगररक्षकाच्या कामावर नेमावं.

**आर्यक** : ठीक आहे. संस्थानक आम्ही आजपासून तुम्हाला पुनः नगररक्षकाचं काम देत आहोंत.

**शकार** : ( अंतःकरण सद्गदित होऊन ) पुनः मी—नगररक्षक ! मघाशी वाचलों पण आतां मात्र अगदीं ठार झालों—सुळावर चढलों ! चारुदत्ता, हे माझे दागिने घे अन् तुझ्या बाळाला सोन्याचा गाडा करून दे.

**रोहसेन** : मला नको तो वाईट—वाईट सोन्याचा गाडा. मला मातीचाच गाडा पाहिजे—होय ना ग आई ?

**आर्यक** : आर्या, आतां एकच विनंति आहे. आपल्या श्रेष्ठ गुणांनीं उज्जयिनी-मधील नागर स्त्रियांना आदर्श झालेल्या या माझ्या भगिनीचा आपण गृहिणी म्हणून स्वीकार करावा.

**चारुदत्त** : मरणाच्या बोहल्यावर, आमचं दोघांचं केव्हांच लग्न लागलेलं आहे, तरी पण लौकिक जगाच्या समाधानासाठीं हा औपचारिक सोहळा आम्हीं करायला तयार आहोंत.

## ५०

उज्जैनी नगरींत आनंदाचें वातावरण. पौरजन स्वातंत्र्यगीत गात गात फिरत आहेत.

चारुदत्त आपल्या वाड्याच्या सौधतलावरून उज्जैनीकडे पाहात आहे. शेजारीं वसंतसेना आहे.

**चारुदत्त :** आज सुखाची अगदीं परिसीमा झाली ! तूं सुखी, मी सुखी—अन् या उज्जैनी नगरांतील प्रत्येक जीवन् जीव सुखी !

( **पूर्णविराम** )